






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका




## गणराज्य दिन विशेषांक : १९६८

वर्ष २३ वे : फेब्रुवारी ६८ : मूल्य १।। रु.

## श्रेयनामावलि–

**आज दीड तपानंतरही दूरदर्शी राष्ट्रीय नेतृत्व अन् दक्ष नागरिकत्व कुठे आहे ?**..... गेल्या दीड तपातील राष्ट्र कार्याचे केलेले मूल्यमापन–**मधु पानवलकर** ● **कथा एका परीची**.... वासनेच्या नागफणीने केलेला भयानक दंश–**प्रा. वसंत कुंभोजकर** ● **अक्षि, परजासत्ताक दीणच म्हना** .... हा आणखी एक 'गण' दिन–**अशोक परांजपे** ● **आवर्त** ....शिल्प सजीव झालं पण–**मनोहर तल्हार** ● **गोमंतकाची नाट्यपरंपरा**... एक नवा प्रकाशझोत–**मलबाराव सरदेसाई** ● **पेच**....नायकाला अधिकच पेचात टाकणारी कर्मकथा–**ना. व्यं. देशपांडे** ● **हृदयपरिवर्तन**...वैचारिक नव्हे शब्दशः–**प्रा. रा. वि. सोवनी** ● **देवाची शेंडी**...एक हळुवार ग्रामीणकथा–**वामन इंगळे** ● **कीचक**...या चालू नाटकावर अखेरचा पडदा – **प्रा. श्री. र. भिडे** शिवाय **रंगमंच**....'**ललितकलादर्श**'**चा हीरक महोत्सव, सन्मानपुष्पे, ऐसी अक्षरे रसिके, इंद्रधनुष्य, दीपमाला, पोटभर हंसायला लावणाऱ्या किंचितिका व भूकंपाच्या नवलकथा**–**सदानंद चेंदवणकर** आणि

## राजकीय संक्रांत कोणावर आणि कशी आली !!

**मर्मभेदक मासिक व्यंगचित्रमाला**

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किमत १।। रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२।।. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar cf Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.

# दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४

टेलिफोन : ३५७७६५ — तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# एकच तारा समोर आणि पायतळी अंधार !

**२६ जानेवारी १९५० !** आधुनिक भारताच्या जडणघडणीतला एक मैलाचा दगड ! स्वातंत्र्याच्या वेदीवर बली चढविणाऱ्या असंख्य ज्ञात–अज्ञात हुतात्म्यांच्या बलिदानाचे मंगल फलित ! विविध भाषा, धर्म, प्रांत, जाति, भूप्रदेश आणि भूप्रदेशातून येणाऱ्या जीवननिष्ठा ह्या सर्वांवर मात करून 'करेंगे या मरेंगे' ह्या निर्धाराने एकसंध म्हणून उभ्या राहिलेल्या भारताचे एक मनोहर मानचित्र ! १८१८ ला नवा संगर सुरू झाला. त्या संगराने कधी हिंसक तर कधी अहिंसक अशी रूपे धारण केली. स्वातंत्र्यासाठी संगर हवा हा विवेक मात्र शाबूत होता. एकत्वाचा विवेक शाबूत होता. विविधतेतली एकता अनुभवायला मिळत होती. शब्द महत्त्वाचे नव्हते. भाव महत्त्वाचे होते. देशावरची प्रीति उत्कट होती. उरातला आवेग उत्कट होता. म्हणूनच उरातून शब्द–नव्हे भाव प्रगट होत होते. . .

"एकच तारा समोर आणिक, पायतळी अंगार." तारा गवसला. सूर्य प्रकटला. तिमिर हरपला. भूमी जयजयकाराने दुमदुमून गेली.

"वंदे मातरम् ! मातृभूमीला वंदन असो." ध्येय सिद्ध झाले. मग उरले काय ?

गेली सतरा वर्षे आपण धापावत हा प्रवास करतो आहोत. एकमेकांना विचारतोच आहोत. अखेर उरले काय ? उरली आहे एक पोकळी – भयाण पोकळी ! जी खायला निघाली आहे स्वतःचीच निर्मिती ! मारायला निघाली आहे स्वतःचीच संताने. भेदाभेद राहिला नाही. आपपर समजेनासा झाला आहे. क्रांति झाली. क्रांति असे बळी घेतच असते असे म्हणतात. पण क्रांतीत जळायला हवे आहे हीण. इथे जे जे सुवर्ण आहे तेच जळून जाते आहेसे दिसते आहे. जे मंगल आहे. सुंदर आहे. पवित्र आहे. ज्याच्या असण्यानेच मुळी ही मूर्ति सुशोभित दिसणार आहे तेच मुळी ही खाऊन टाकते आहेसे दिसते आहे. ह्या देशातले सारे ह्या देशाचे होते. गंगेने कधी हा बंगाली-मद्रासी–पंजाबी म्हणून जवळ घेण्याचे नाकारले नाही. हिमालय हे अवघ्या भारताचे भूषण. शरद–बंकिम–टागोर ही देशाची लेणी. कालिदास, भवभूति अवघ्या देशाचे. राजाजी ह्या राष्ट्राचे पहिले भारतीय गव्हर्नर जनरल–हाच खरा हुंकार–हेच विविधतेतले एकत्व. हेच इथे शतकानुशतके घडले. वाढले. घडणार आहे. वाढणार आहे. ह्या क्रांति–वणव्यातून पुन्हा सुवर्ण बनून हेच वर येईल. कारण हीच भारताची खरी 'प्रकृति' आहे. पण ती त्याला गवसत नाहीशी झाली आहे. 'तुझे आहे तुजपाशी' हा साक्षात्कार करून देणारा हा मंगल दिवस. पण आज तरी पुन्हा तिमिर दाटला आहे. दृष्टि अंध झाली आहे. कैफ चढला आहे तिच्यावर. विनाशाचा कैफ, भाषेचा कैफ, प्रांतांचा कैफ, वेगळ्या संस्कृतीच्या भ्रामक कल्पनांचा कैफ, सग्यासोयऱ्यांनाच झोडपीत राहणारा कैफ, स्वतःचेच पाय तोडून पंगु करणारा कैफ, दैवाने, नियतीने साधुसंतांच्या पुण्याईने, असंख्य हुतात्म्यांच्या त्यागाने, बलिदानाने, रक्त सिंचलेल्या पायघड्यावरून एक पुण्य–शतशतकांचे पुण्य आमच्या दारी आले आहे. आपली जात ओळखण्याऐवजी त्या पुण्याची जात आपण ओळखली पाहिजे. आपली भाषा अंधत्वाने डोक्यावर मिरविण्याऐवजी आपण त्या पुण्याची परिभाषा समजून घेतली पाहिजे. त्या पुण्याकडे पुण्यमय दृष्टीने एकदा नीट पहा तरी – नवी, ध्येयदर्शी दिव्य दृष्टि तुम्हाला लाभेल बघा. त्या दृष्टीची आज, कधी नव्हती इतकी ह्या देशाला गरज आहे. ते पुण्य वंचित होऊन ह्या दारातून कधीही परत जाता कामा नये.

–संपादक



अनुक्रमणिका








## पक्ष गोणपाटात भरा

स. न. वि. वि.

आपले राज्यकर्ते (?) आपल्यांच लोकांचे संततीनियमन करतात, शिवाय निधर्मीपणाचा बुरखा पांघरून हिंदूंना लाथा नि परधर्मीयांचे पाय चाटतात. ते जरी जन्माने हिंदू असले तरी काडीचा स्वाभीमान नाही त्यांना!! आपणास, सध्या चालू असलेला कॉंग्रेसी बांडगुळांचा 'कारभार' पसंत आहे का? आपण हिंदूधर्माभिमानी आहात म्हणूनच मी पत्र लिहित आहे. थडग्यावरून पूल बांधतात शिवाय पूल वांधल्याबद्दल भाडे भरतात. ह्या भित्रेपणाला तोड नाही. सुशिक्षित हिंदू लोक समंजसपणे संततीनियमन करतात नि देशबुडवे मुसलमान –खिश्चन करीत नाहीत. सध्याच ते ३५ टक्के आहेत. त्यामुळे बुद्धीवान हिंदूंची संख्या कमी होईल. मग कॉंग्रेसचे सत्तांध निवडून येताना कोणी अडवणार नाही. पण ते लोक बहुसंख्य झाल्यावर बांडगुळांच्या हातातून सत्ता घेऊन, येथे पाकिस्तान करून टाकतील. मग भावी पिढयाना गणपती वा अन्य सण करणे नको. अपमानीत जीवन कंठावे लागेल. सर्वांची सुंता होईल, मुली पळवतील, डोळयादेखत गाई कापतील नि ह्या दोषाचे खापर तुम्हा आम्हा स्वाभीमानी, पण निष्क्रिय लोकांच्या माथी ते फोडतील. माझ्या म्हणण्याचा जरूर विचार करा. पैसा, पोरी, मटग, दारु, धाक ह्या गंजलेल्या शस्त्रांच्या जोरावर तरुण हिंदूंना आंधळे करून त्यांची मनोवृत्ती संकुचित बनवून, देशभक्ती निद्रीस्त ठेवून गरीब–निरक्षर, हिंदूंची मते मिळवून सर्व हिंदूंचे 'खच्चीकरण' जोरात आपले चालूच आहे! सर्व हिंदूंनी एकत्र आल्यास ह्या बांडगुळाना चेचून टाकता येईल. त्या कामात जनसंघ फुसका ठरला आहे. त्यांच्यावर विसंबून राहण्यात अर्थ नाही. सर्वांना आपापल्या परी जागृतीचे काम कळकळीने करण्याची वेळ आली आहे. १९७२ सालापर्यंत सर्वांनी पक्ष गोणपाटात भरून देशबुडव्यांच्या हाती असलेली आपली मान हिसडा मारून सोडवून घेतली पाहिजेच. ही हिंदूंची आणीबाणी आहे. सर्वांनी नेटाने, जिद्दीने देशबुडव्यांना हाकलले पाहिजे. ७२ सालात दोनच पक्ष देशधर्मरक्षक विरूद्ध भक्षक! आपल्या दशाचे नावाला कमीपणा आणला बांडगुळांनी. जागृतीसाठी चार-पाच भाषातून मासिके काढण्याचा, सर्वांच्या साह्याने विचार आहे. पुन्हा हा देश सर्व दृष्टया तळपला पाहिजे. पाक-चीनने हुं का चूं करता कामा नये. बस्! मागे राहील तो पळपुटया भेकड, विरोध करील तो देशबुडव्या. देशबुडव्याना देवाच्या कोर्टात पाठविण्यात येईल. तळमळीच्या अनेक पुढाऱ्यांना याबाबत लिहिले आहे. पाहू किती जण जिद्द तडफ दाखवतात? फक्त हिंदूनाच मताधिकार! इतरांची राजकारणात लुडबूड नको! सैन्यात, पोलिसात फक्त हिंदूच राहातील. अपप्रवृत्तींचे निर्मुलन करून अणुबाबत सिद्ध राहाता येईल. बांडगुळांचा नायनाट केलाच पाहिजे. बस्!

**कुर्ला, मुंबई ७०** **—अरुण साठे**

[सदरहू पत्र खरोखरीच तळमळीने लिहिलेले आहे. आशयही विचारार्ह आहे म्हणून केवळ चर्चेसाठी वाचकांसमोर ठेवले आहे–संपादक]

## आद्य नाटककार कोण? पेडणेकरीण की केरकरीण!

स. न. वि. वि.

श्री. का. वा. केंकरे यांची माहिती जर खरी असेल तर सोनाबाई चिमाजी केरकरीण यांचे संगीत छत्रपती हे नाटक पहिले ठरते पण तरीही नाटक लिहिणे व रंगभूमीवर येणे या दोन्ही गोष्टींमुळेच खरोखर नाटककाराचा दर्जा मिळतो. 'संगीत छत्रपती संभाजी' नाटक रंगभूमीवर आल्याचे ऐकीवात नाही. उलट 'संगीत दामिनी' हे नाटक स्त्रीने लिहून प्रथम रंगभूमीवर आले आहे.




या दृष्टीने हिराबाई पहिल्याच ठरतात. मासिक 'मनोरंजना'चा हा अभिप्राय पहा:

'दामिनी नाटकाविषयी येथे नमूद करण्यासारखी एक अभिनंदनीय गोष्ट ही की, हे नाटक एका महाराष्ट्रीय स्त्रीने–त्यातही विद्येत मागासलेल्या जातीतील एका विदुषी स्त्रीने–लिहिले असून महाराष्ट्र रंगभूमीवर स्त्रीने लिहिलेले नाटक येण्याचा हा प्रसंग केवळ अपूर्व होय–' 'मुंबईची रंगभूमी', मनोरंजन जानेवारी १९१३.

अपूर्व म्हणजे 'पूर्वी न झालेला प्रसंग'

'पुरुषाचे बंड' या सौ. गिरिजाबाई केळकर यांच्या नाटकाला प्रस्तावना लिहिताना श्रीपाद कृष्ण कोल्हटकर लिहितात, "गेल्या वर्षापर्यंत स्त्रीने लिहिलेले संगीत नाटक रंगभूमीवर आले नव्हते; ती उणीव 'दामिनी' नाटकाने भरून काढली." यावरून "दामिनी" हे नाटक स्त्रीने लिहून रंगभूमीवर आलेले पहिले मराठी संगीत नाटक ठरते.

दोन्ही नाटकावर लेखिकेचे नांव 'पेडणेकरीण' असे लिहिले नसून 'पेडणेकर' असे लिहिले आहे. हिंदू स्त्रियांच्या कुलनामापुढे 'ईण' प्रत्यक्ष लावण्याची पद्धत फक्त गोव्यातच नसून संपूर्ण महाराष्ट्रात आहे. मात्र बोलतानाच उदाहरणार्थ, 'काल पाठकीणबाई भेटली होती.' वगैरे.

**नागपूर** **–प्रा. म. ळ. वऱ्हाडपांडे**










आता दीड तपानंतर आमची गरज....

# दूरदर्शी राष्ट्रीय नेतृत्व अन् दक्ष नागरिकत्व कोठे आहे ?



चालू परिस्थितीचे चक्र उलटे फिरायला पं. नेहरूंच्या कारकीर्दीत सुरुवात झाली.... ती प्रक्रिया त्यांच्या पश्चात पुरी झाली इतकेच....

—मधु पानवलकर

**भारतीय** प्रजासत्ताकाचे दीड तप आता पुरे होत आहे. या पुरातन देशाच्या प्रदीर्घ इतिहासाच्या संदर्भात अठरा वर्षांचा कालखंड अगदीच तोकडा ठरतो; परंतु ऐतिहासिक महत्त्वाच्या व दूरगामी परिणाम करणाऱ्या घटनांनी हा कालखंड भरलेला असल्याने त्याला आगळे महत्त्व प्राप्त होणे साहजिक आहे. कदाचित असेहि म्हणता येईल की या दीड तपात पुढील दीड शतकाच्या इतिहासाचा पाया घातला गेला आहे.

साहजिकच प्रश्न असा निर्माण होतो की भविष्याची पायाभरणी आपण चोखपणे केली आहे काय ? कळत-नकळत त्यात कुठे उणीव तर राहून गेली नसेल ना ? आणि ज्या इमारतीचा आराखडा डोळ्यापुढे ठेवून पाया रचला तीच इमारत बांधली जात आहे ना ?

यातला प्रत्येक प्रश्न कोणाहि विचारी माणसाला अंतर्मुख बनविणारा आहे. आपले पाकिस्तानी शेजारी तर म्हणू लागले आहेत की पाकिस्तानात अयुबशाही सुरू झाली तेव्हा तेथे जी परिस्थिति होती तीच परिस्थिति आज भारतात निर्माण झाली आहे; मतितार्थ असा की भारत लष्करशाहीच्या दिशेने वाटचाल करीत आहे. "लवकरच माझ्यासारखी हो" असा दुष्ट आशीर्वाद देणाऱ्या रक्तवस्त्रधारी विधवेची मनोवृत्ति पाकिस्तानी 'डॉन'च्या वरील उद्गारातून व्यक्त होत असली तरी लष्करशाहीच्या धोक्याची जाणीव काही मान्यवर भारतीय नेत्यांनीहि करून दिलेली होती, हे विसरता येणार नाही. तसे करण्याची वेळ यावी हेच मूळात भयसूचक आहे.

स्वतंत्र भारताचा वीस वर्षांचा इतिहास याच निष्कर्षाप्रत येऊन पोचतो काय ? लॉर्ड माऊंटबॅटन यांनी याच वीस वर्षांच्या इतिहासाला 'एक महान जयगाथा' म्हणून गौरविले आहे तर जॉन ग्रिग यांनी त्याला कौतुकाने "राजनीतीतील नवल" म्हटले आहे. मित्रप्रेमाचा भाग वगळूनसुद्धा या दृष्टिकोनात काही तथ्य आहे, हे मान्य करावयास हवे. आसेतुहिमाचल प्रदेश एका केंद्रीय सत्तेच्या अमलाखाली आणून त्याला धर्मातीत, लोकशाहीप्रधान, विज्ञानाभिमुख आधुनिक देश बनविण्याचा प्रयत्न करणे ही सामान्य घटना नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेचच हा प्रयत्न हाती घेण्यात आला व फाळणीच्या जखमा भळभळा वहात असताहि धर्मातीत लोकशाहीचे बीजारोपण भारतात करण्यात आले. देशाच्या इतिहासातील एक नवे प्रकरण लिहिले गेले. या पुराणभूमीला आधुनिक युगात आणण्याच्या दिशेने टाकलेले ते पहिले पाऊल होते. त्याच्या पुढचे पाऊल म्हणून आर्थिक नियोजन हाती घेण्यात आले. लोकांचे जीवनमान उंचावणे, देशाचा औद्योगिक पाया विस्तृत करणे व आर्थिक दृष्ट्या देश पुन्हा समृद्ध बनविणे आणि हे सर्व कमीत कमी वेळात साधणे अवश्य असल्याने नियोजनावाचून गत्यंतरच नव्हते. स्वातंत्र्याची पहिली पांच वर्षे सुरु





होण्यापूर्वीच नियोजनाचा गाडा मार्गस्थ झाला होता. भारतीय उपखंड नव्या आशा आकांक्षांनी पालवू लागले. सारे जग या स्थित्यंतराकडे कौतुकाने पाहू लागले.

भारतीय स्वातंत्र्याबरोबर आशिया—आफ्रिकेतील वसाहतवादाचे उच्चाटण होण्याची प्रक्रिया जोराने सुरू झाली आणि आपल्यासकट या नवजात राष्ट्रांना जागतिक सत्तास्पर्धेपासून अलिप्त राहून आपले उजाड संसार सावरण्याची उसंत मिळावी असेच परराष्ट्रीय धोरण अंगिकारण्यात आले. शांततेचा पुरस्कार, वसाहतवादाचा विरोध व सत्तास्पर्धे-पासून अलिप्तता यांवर आधारलेल्या या धोरणाला प्रारंभी अमेरिकेसारखा देश विरोध करीत राहिला तरी या धोरणाचे औचित्य नंतर सर्वांनाच मान्य करावे लागले.

भारताची प्रतिमा जगात उजळून निघाली, प्रतिष्ठा उंचावली व अपेक्षा वाढल्या त्या या विविध क्षेत्रात पहिल्या दहा वर्षांच टाकलेल्या पावलांनी. हे यश कोणालाहि हेवा वाटावा असेच होते, यात शंका नाही.

पण आजचे चित्र किती वेगळे आहे? चांगले फोफावू लागलेले रोपटे खुरटलेले, कोमेजलेले दिसते हे नाकारण्यात काय हंशील आहे? वीस वर्षांत विविध क्षेत्रात झालेल्या प्रगतीचे तुलनात्मक आकडे मांडून गोंडस चित्र उभे करता येईल, नाही असे नाही. पण तसे करून वस्तु-स्थिति दडविता येणार नाही. आज राष्ट्रीय जीवनाचे एकहि अंग असे आढळणार नाही की ज्यात 'क्रायसिस' निर्माण झालेला नाही. उद्योग, व्यापार, शिक्षण, राजकारण, समाजकारण, शेती, प्रशासन, परराष्ट्रसंबंध इत्यादि सर्वच क्षेत्रात आपली कोंडी झाल्यासारखी वाटते; एवढेच नव्हे तर ती कोंडी फोडायची कशी हे न कळल्याने एक प्रकारची अगतिकता निर्माण झालेली दिसते. हे असे कां? दहा वर्षांत चक्र उलटे कसे फिरले? पं. नेहरूंसारखा नेता आपण गमावला म्हणून? नेहरूंच्या मार्गापासून त्यांचे सहकारी ढळले म्हणून? तसे सांगितले जात असले तरी ते खरे नाही. चक्र उलटे फिरायला नेहरूंच्या कारकीर्दीतच सुरुवात झाली होती. ती प्रक्रिया त्यांच्या पश्चात पुरी झाली इतकेच. आणि नेहरू असते तर ही परिस्थिति आली नसती, असे म्हणायला आधार कोणता? एखाद्या व्यक्तीचे अस्तित्व वा अस्तित्वाभाव राष्ट्राच्या जीवनाला वळण लावू शकतो, हे मान्य करूनसुद्धा वर्तमान स्थितीला नेहरूंचा अभाव कारणीभूत आहे, असे म्हणणे म्हणजे त्यांच्यानंतरच्या राष्ट्रीय नेतृत्वाला अन्याय करणे होय.

संकल्प आणि सिद्धी यात अंतर पडायला नेहरूंच्या हयातीतच प्रारंभ झाला होता आणि ह्याचे कारण साध्य, साधने व धोरणे यातील अंतर्विरोध हे होय. नेहरू आपल्या लोकप्रियतेच्या शिखरावर असताना हे अंतरविरोध, या विसंगती विशेष जाणवल्या नाहीत; नंतर त्या प्रकर्षाने जाणवू लागल्या इतकेच. हे अंतर्विरोध कोणते? साध्य-साधनांतील अंतराला याबाबतीत प्राधान्य द्यावे लागेल. सामाजिक, आर्थिक, राज-कीय क्षेत्रात जी ध्येये पुढे ठेवून आपण मार्गस्थ झालो ती ध्येये उच्च असली तरी ती साध्य करण्यासाठी आपण काय व्यवस्था केली होती? धर्मातीत राज्य, संसदीय लोकशाही, लोकशाहीच्या चौकटीत आर्थिक नियोजन, जागतिक राजकारणात शांततावादी विचार-प्रणालीचे मार्गदर्शन या गोष्टीच अशा होत्या की त्या साध्य करण्यासाठी त्या त्या क्षेत्रात आमूलाग्र परिवर्तनच व्हायला हवे होते. काही बाबतीत पूर्वपरंपरेला सोडून पुढे जाण्याचा काही बाबतीत पूर्वपरंपरेशी सुसंगत पण बराच पुढचा टप्पा गाठण्याचा जो प्रयत्न आपण करू इच्छित होतो, तो आवश्यक ते भावना-त्मक, विचारात्मक व संस्थात्मक बदल केल्यावांचून शक्य नव्हता. वाघाची शिकार करायची तर तयारीहि तशीच हवी. तशा तयारीविना वाघाची शिकार संभवतच नाही.

उदाहरणार्थ, नियोजनाचा पसारा आपण मांडला; शांततामय, लोकशाही मार्गाने देशाचा तोंडवळा बदलून टाक-ण्याचे महत्त्वाकांक्षी काम हाती घेतले. कायदा आणि सुव्यवस्था राखण्याच्या कामाला सरावलेल्या राज्ययंत्रणेवर नियोजनामुळे जी नवीन जबाबदारी येऊन पडत होती ती तिला पेलता यावी म्हणून भावनात्मक, वैचारिक व प्रशास-कीय अशा तिहेरी दृष्टींनी तिची पूर्वतयारी करणे जरूर होते. योजना-कार्यात जनतेला सामावून घेऊन तिचे सहकार्य संपादन करणे ही दुसरी गरज होती. आणि नियोजनात अभिप्रेत अस-लेली वैचारिक व प्रशासकीय शिस्त सर्व थरातील नेत्यांनी स्वतःला लावून घ्यायला हवी होती. यातली एक तरी गोष्ट झाली आहे काय? आधुनिक कारखाने, प्रचंड धरणे, भव्य प्रकल्प उभे करूनच आधुनिक देश निर्माण होत नसतो; त्याला आणखी जरुरी असते ती आधुनिक दृष्टिकोनाची; आधुनिकतेच्या मुळाशी असलेल्या विज्ञान व तंत्रविज्ञानजन्य शास्त्रीय मनोभूमिकेची. गेल्या वीस वर्षात हे घडलेले नाही. देशात सर्वव्यापी असे



नेतृत्वाला नवे आव्हान



## श्री. भाऊसाहेब खांडेकर

मराठीतील एक ज्येष्ठ साहित्यिक थोर कथा–कादंबरीकार श्री. वि. स. खांडेकर यांनी १९ जानेवारी १९६८ ला वयाची सत्तर वर्षे पूर्ण करून एकाहत्तराव्या वयात पदार्पण केले आहे त्याबद्दल "दीपावली"-तर्फे मी त्यांचे अभिनंदन करतो. भाऊसाहेबांचा व दीपावलीचा संबंध खूप जुना आहे. जिव्हाळ्याचा आहे हे मराठी साहित्य रसिक जाणतातच. भाऊसाहेब म्हणजे एक मूर्तिमंत संघर्ष आहे असे मला नेहमी वाटत आले आहे. प्रकृति आणि व्यक्तित्व, आजार आणि जीवननिष्ठा यांचा सतत संघर्ष त्यांच्या आयुष्यात चालू आहे. ह्या संघर्षात अनेक आघात झेलूनही भाऊसाहेबांची जीवननिष्ठा यशस्वी ठरली आहे. आज ती जीवनाची सत्तरी ओलांडत आहे. ह्या सत्तरीचे मोल फार मोठे आहे. साहित्यनिष्ठा तर फारच मौलिक. भाऊसाहेबांना उदंड आयुष्य लाभो. साहित्यसेवा उदंड घडो ही इच्छा व्यक्त करतो.

---

परिवर्तन घडविण्याची भाषा आपण करीत राहिलो, पण त्यासाठी आवश्यक पूर्वतयारी आपण केली नाही; अजूनहि करीत नाही. आणि याचे कारण स्वातंत्र्यानंतर राज्यसत्ता ज्यांच्या हाती गेली त्यांनी 'क्रांतीची बाळे' म्हणवून घेण्यात गौरव मानला; क्रांतिकारक होण्याचा, क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न केला नाही. परिणामतः आपले एक पाऊल पौराणिक काळात आणि दुसरे अणुयुगात. यातून निर्माण होणाऱ्या अंतर्विरोधांची छाया वर्तमान राष्ट्रीय जीवनावर पुरती पडलेली आहे.

'विज्ञानाचे विज्ञान' असा तर्कशास्त्राचा महिमा सांगतात. तर्कशास्त्र असे सांगते की ठराविक गोष्टी दिलेल्या असतील तर विशिष्ट परिस्थितीत यातून विशिष्ट निष्कर्ष निघतात; किंवा विशिष्ट निष्कर्ष विशिष्ट अवस्थेत काढावयाचा असेल तर विशिष्ट मार्गानेच जावे लागते. भारतीय राजकारणात ही दृष्टि आज दिसत नाही—गेल्या वीस वर्षांतहि ती कधी नव्हती. भाषावार राज्य पुनर्रचना, राज्यभाषा, शेती, परराष्ट्रसंबंध, परदेशी व्यापार इत्यादि प्रश्नांच्या बाबतीत याचा चांगला प्रत्यय येतो. भाषावार प्रांतरचना करायची की नाही, परदेशी भाषेचे लोढणे टाकून ज्या भाषेचा प्रसार 'राष्ट्रभाषा' म्हणून वर्षानुवर्षे केला तिचा स्वीकार राज्यभाषा म्हणून करावयाचा की नाही हे मूलभूत प्रश्न होते. एकदा होकारार्थी निर्णय घेतल्यावर त्याप्रमाणे पद्धतशीरपणे पुढील पावले टाकणे एवढा एकच मार्ग उरतो. प्रत्यक्षात निर्णय घ्यावयाचा पण त्याची तर्कशुद्ध परिणती स्वीकारण्यास मात्र कुचराई करावयाची असा प्रकार सातत्याने होत राहिला. आणि आज हेच प्रश्न राष्ट्रीय ऐक्याच्या मुळावर येऊ पाहात आहेत.

पण तर्कदुष्टपणा राज्यकर्त्यांच्याच पाचवीला पुजला आहे, असे मात्र समजण्याचे कारण नाही. कम्युनिस्टांचा अपवाद सोडला तर जवळ जवळ सगळेच पक्ष तर्कदुष्टपणाच्या आहारी गेलेले आहेत. कम्युनिस्टांच्या राजकारणात परस्पर विसंगति, संधिसाधूपणा इत्यादि अनेक दोष आढळत असले तरी भारताला आंतरराष्ट्रीय कम्युनिझमच्या दावणीस बांधणे हे त्यांचे उद्दिष्ट स्वच्छ व स्पष्ट असते आणि सगळे पवित्रे त्या एकाच उद्दिष्टाच्या पूर्तिसाठी टाकले जात असतात. त्यामुळे त्यांच्या कोलांटउड्यांत सुद्धा सुसंगतीचा एक सुप्त भाग सांपडू शकतो. परंतु लोकशाही समाजवादाचा गंडा बांधून चीनवादी कम्युनिस्टांच्या गळ्यात गळा घालणारे संयुक्त समाजवादी, संयुक्त आघाड्यांचा धिक्कार करून संयुक्त सरकारात सामील होणारे प्रजासमाजवादी, कम्युनिस्टांशी छत्तिसाचा आकडा असतानाहि कम्युनिस्टांबरोबर सत्ताग्रहण करणारा जनसंघ यांना काय म्हणावे ? नदीच्या पाण्याचा वा राज्याच्या सीमेचा प्रश्न आला की ही सगळी तत्त्वज्ञाने आणि पक्ष कोलमडून पडतात. आंध्र, महाराष्ट्र, म्हैसूर या राज्यातील राजकीय पक्षांच्या या दोन प्रश्नांवरील भूमिका तपासून पाहणे बरेच मनोरंजक ठरेल.

चौथ्या सार्वत्रिक निवडणुकीने राजकारणाला स्थैर्य प्राप्त करून देण्याऐवजी गोंधळच अधिक निर्माण केला. देशापुढील एकाही प्रश्नाबद्दल या निवडणुकीत निर्णय मिळाला नाही किंवा मार्गदर्शन लाभले नाही. राजकारणाचा घाणा कॉंग्रेसद्वेषाच्या मेढीभोवती फिरू लागला—अजूनहि फिरतो आहे. कॉंग्रेसला सत्ताभ्रष्ट करण्याची आकांक्षा विरोधकांनी बाळगावी, हे योग्यच आहे. पण कॉंग्रेस कां नको, या प्रश्नाचे प्रत्येक पक्षाचे काही उत्तर आहे की नाही ? उजवे आणि डावे कम्युनिस्ट, प्रसोपा आणि संसोपा, जनसंघ आणि स्वतंत्र यांची उत्तरे एक असणे कधीतरी शक्य आहे काय ? स्वतंत्रांना ज्या कारणासाठी कॉंग्रेस नको त्याच्या अगदी उलट कारणासाठी कम्युनिस्टांना ती नको. असाच प्रकार इतरांच्या बाबतीतहि आहे. कोणताहि एक किंवा समान विचारांचे अनेक पक्ष कॉंग्रेसला पर्याय ठरू शकतील; परंतु धोरण, कार्यक्रम, निष्ठा यांबाबतीत जमीन अस्मानाचे अंतर असलेले सर्व



अनुक्रमणिका










### आधुनिक दृष्टीकोनाचा अभाव

पक्ष मिळून पर्याय निर्माण होत नाही, हे बंगाल, पंजाब, बिहार, उत्तर प्रदेशात दिसून आलेच आहे. कॉंग्रेसला सत्ताभ्रष्ट करण्याची ताकद कोणत्याहि एका पक्षात नाही, म्हणून पांच पंचवीसजणांनी एकत्र येऊन कार्यसिद्धी करावी, अशी स्वप्ने अजूनहि विरोधी पक्षनेते पाहतात तेव्हा आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाही. व्यवहारात आपण पाहतो की खोकला थंडीने होतो तसाच उष्णतेनेहि होतो. खोकला एक असला तरी त्याची कारणे वेगवेगळी असतात व त्याप्रमाणे इलाजहि वेगवेगळे करावे लागतात. हे लक्षात न घेताच एकच औषध सर्व प्रकारच्या खोकल्यावर वापरले किंवा सर्व औषधांचे मिश्रण करून ते पाजले तर खोकला जाणार नाहीच पण रोगी उरेल की नाही याची चिंता मात्र पडेल. कॉंग्रेसरूपी खोकला घालविण्यासाठी सर्वपक्षीय चूर्ण देण्याच्या अट्टाहासामुळे कॉंग्रेसला प्रारंभी काही धक्के खावे लागले तरी तिच्या अस्तित्वाला धोका पोचण्याची शक्यता नाही. विरोधकांच्या पदरी वैफल्याचे माप मात्र भरभरून पडले.

आज ही प्रक्रिया सुरू झालेलीच आहे. दोन दिवसांच्या अवधीत तीन कॉंग्रेसेतर सरकारांचा अंत झाला; दुसरी दोन त्या वाटेवर आहेत. ती केव्हा अस्तंगत होतील हे सांगता येणार नाही. संसोपा, प्रसोपा व जनसंघ या तीनहि पक्षांनी त्याबद्दल कॉंग्रेसवर आगपाखड केलेली असली तरी एक गोष्ट स्वच्छ आहे की ही सरकारे मोडली ती कॉंग्रेसच्या अक्कल हुशारीने नसून विरोधकांच्या आततायीपणामुळे होय. त्यांना अधिक चोख कारभार करता आला नाही, विधायक कार्यक्रम हाती घेण्यात यश आले नाही, कायदा व सुव्यवस्था टिकविता आली नाही आणि ज्या अंतर्विरोधांबद्दल कॉंग्रेसवर शरसंधान केले जाई ते आंतरविरोध कॉंग्रेसेतर सरकारांच्या पांचवीलाच पुजलेले होते. या गोष्टींची दखल न घेता गया, कानपूर, कालिकत येथे ज्या धोरणांचा पुनरुच्चार करण्यात आला त्यामुळे कॉंग्रेसच्या राजकीय पुनर्वसनाला प्रारंभ झाला आहे, असे म्हणावयास प्रत्यवाय नाही.

कॉंग्रेस पक्षाला एका दृष्टीने हे उपकारकच ठरेल. निम्म्या अधिक देशातील गेलेली सत्ता इतक्या झटपट परत येण्याचा मोका यावा यापरते भाग्य कोणते? पण ते पुरते पदरात पाडून घेण्याइतकी ताकद कॉंग्रेसमध्ये नसली तर कोण काय करणार? नेतृत्वाचा 'क्रायसिस' तसा सगळ्याच पक्षात आहे; पण कॉंग्रेसइतका तो अन्यत्र तीव्र असेल असे वाटत नाही. हा सर्वात मोठा पक्ष अजूनहि राष्ट्रीय नेतृत्वाच्या शोधात आहे. या पक्षाचे नेतृत्व खऱ्या अर्थी 'राष्ट्रीय' आहे, असे म्हणवत नाही. 'हाय कमांड'मधील नेते

प्रत्येक प्रश्नाकडे राष्ट्रीय दृष्टिकोनातून पाहू शकले असते तर आज चित्र फार वेगळे दिसले असते. खऱ्या अर्थी प्रांतिक नेते असलेले लोकच विशिष्ट राजकीय परिस्थितीमुळे केंद्रावर प्रभाव पाडीत आहेत आणि तीच खरी अडचण आहे. याचे अगदी ताजे उदाहरण म्हणजे राजभाषा विधेयकाविरुद्ध दक्षिणेत झालेली हिंसात्मक निदर्शने. गाड्या जाळल्या गेल्या, स्टेशने उध्वस्त झाली, नागरी भाषेतल्या नांवाच्या पाट्या शिल्लक राहिल्या नाहीत. विद्यार्थ्यांच्या आणि लोकांच्या झुंडी जाळपोळ करीत हिंडत होत्या आणि त्यांना अडविण्याची चिंता पोलिसांना दिसत नव्हती. मुंबईतील शिवसेनेच्या चळवळीचा विपर्यास करून तिला व महाराष्ट्र सरकारला दोषी ठरवण्यात इतरांबरोबर काँग्रेसनेतेहि सामील होते. मुंबईमध्ये असे चिंता करण्यासारखे काही घडलेच नव्हते; मद्रास राज्यातील घटना कितीतरी गंभीर व राष्ट्रीय ऐक्यालाच आव्हान देणाऱ्या होत्या. या घटनांचा धिक्कार करण्यास किती काँग्रेस नेते पुढे आले? काँग्रेसचे तेव्हाचे अध्यक्ष श्री. कामराज यांनी मागूनपुढून तरी निषेधाचा सूर काढला काय? त्यांनी नापसंती व्यक्त केली ती राज्यभाषा विधेयकातील दुरुस्त्यांबाबत आणि श्री. सुब्रह्मण्यम् यांनी तिकीट प्रकरणी यावरहि ताण केली. श्री. अन्नादुराईंनी अविवेकाने तिकीट-वितरण समारंभ रद्द केला तेव्हा आपण मागे पडू नये या धास्तीने श्री. सुब्रह्मण्यम यांनी त्यांच्या कृतीला पाठिंबा दिला. राष्ट्रीय नेते म्हणून वावरणाऱ्या नेत्यांचे पितळ उघडे पाडणाऱ्या या घटना आहेत. हैद्राबाद येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात ही परिस्थिति सुधारेल असे फारसे काही घडले नाही.




म्हणूनच राजकीय वातावरणाची लाट काँग्रेसला अनुकूल दिसत असली तरी तिचा फायदा घेऊन देशाला नवे नेतृत्व देण्याची कुवत आज काँग्रेस पक्षात उरली आहे, असे दिसत नाही. ज्या नेत्यात तशी कुवत आहे ते सर्वोच्च पातळीवरील सत्तेच्या राजकारणात जखडले गेले आहेत. त्यामुळेच हैद्राबादला काँग्रेस पक्षाला एक निश्चित दिशा दाखविण्यास नेतृत्व असमर्थ ठरले.

प्रारंभीच म्हटल्याप्रमाणे अनेक क्षेत्रात फार मोठी प्रगति झालेली असताहि एकूण चित्र फारसे उत्साहदायी नाही, ते यासाठी. भारतापुढील आर्थिक अडचणी मोठ्या असल्या तरी अनुल्लंघ्य नाहीत. ब्रिटन–अमेरिका आपल्या आर्थिक अडचणींवर मात करण्यासाठी जे जिद्दीचे प्रयत्न करीत आहेत त्यातली थोडीफार जिद्द आपण दाखविली, स्वत:ला शिस्त लावून घेतली तर आपणालाहि संपन्न भविष्यकालाची स्वप्ने पाहता येतील.

उणीव आहे ती दूरदर्शी राष्ट्रीय नेतृत्वाची आणि आपले कर्तव्य जाणणाऱ्या दक्ष नागरिकांची. भारतीय प्रजासत्ताकाची ही किमान गरज आहे. ●

# कशा एका परीची

डॉक्टरांच्या बद्दल जी कुजबूज बाहेर ऐकू येत होती
त्याची प्रचिती अखेर अरुणालाही आली हं........
....अरुणाला पण डॉक्टर हवे होते. कशासाठी ?

—वसंत अ. कुंभोजकर

**सकाळी** आठ साडे-आठच्या सुमाराला डॉक्टर सान्यांच्या इस्पितळातील वातावरणात अनेक गंध मोठ्या गंमतीदारपणे एकमेकात मिसळत असतात. इस्पितळाच्या चारी अंगाला डवरलेल्या बगीच्यातून तरळत येणारा फुलांचा संमिश्र सुगंध. वावल्या मेहतरानं पुसून पुसून चकचकीत केलेल्या वॉर्डच्या फरशीवरून सर्वत्र पसरणारा फिनेलचा वास. बिछान्या बिछान्यावरून परिचारिकानी नुकत्याच बदललेल्या, परिटघडीच्या शुभ्र चादरींचा आणि निर्जंतु केलेल्या रगांचा उबदार उत्तेजक वास. स्वतः डॉक्टर साने बसतात, त्या खोलीत साईबाबांच्या तसबिरीसमोर दरवळणाऱ्या चंदनी अगरबत्त्यांचा प्रसन्न पवित्र सुवास. एरवी दिवसभर इस्पितळाच्या आवारात भरून राहाणाऱ्या औषधांच्या उग्र भपकाऱ्याचा या वेळी कुठं मागमूसही नसतो. सगळीकडं तरळत असणारा गंध कसा हवाहवासा वाटतो. यातनांचा, दुखण्याचा विसर पडायला लावतो.

आणि तरीही आणखी एका सुगंधाची मोठ्या उत्कंठेनं प्रतिक्षा चालू असते. आपापल्या बिछान्यावर अर्धवट उठून आणि पाठीशी उभ्या केलेल्या उशाना रेलून, सारे रुग्णाईत अरुणेच्या आगमनाची वाट पहात असतात. साडे आठ वाजता ती वॉर्डच्या दारात प्रगट होते. आणि त्यासरशी, इस्पितळाच्या तेवढ्या भागाला, एकाद्या परिकथेतील रमणीय उद्यानाचं रूप प्राप्त होतं. परीसारखांच तलम



अनुक्रमणिका

शुभ्र पेहेराव केलेली, केसांच्या कुळकुळीत अंबाड्यावर स्वच्छ त्रिकोणी रुमाल बांधलेली, खूपसे गुलाबांचे गेंद दोन्ही हातात धरून, तो सगळा पुष्पसंभार छातीवर टेकविलेली आणि त्या गुलाबांच्या ताज्या फुलाहूनही टवटवीत मोहक दिसणारी अरुणा, थेट स्वर्गातून अगर परिराज्यातून उतरल्यासारखी दिसते. प्रत्येक रुग्णाच्या बिछान्यानजिक जाऊन, हंसतमुखानं त्याच्याशी एखादंच वाक्य बोलते आणि एक दोन गुलाबाचे गेंद त्यांच्या हातात देते. फुलांच्या सुगंधाहून निराळा, असा एक अनिर्वचनीय आनंद वॉर्डच्या कोना-कोपऱ्यात भरून जातो. सर्व रोग्यांना फुलं वाटून झाली, की अरुणा भुर्रकन् निघून जाते. आणि इतकावेळ परिकथेतील बागेचं रूप आलेली ती वास्तू, परत 'दवाखाना' बनते. इतका वेळ हिंदोळे बनलेले रोग्यांचे बिछाने, परत लोखंडी खाटा होतात. पाठीला मरगळलेला रुतू लागतात. काही वेळासाठी पळून गेलेली दुखणी, फिरून आपापल्या जागी येतात. अर्धवट उठून बसलेले रोगी, पाठीशी उश्या केलेल्या उशा आडव्या करतात. त्यावर डोकं टेकून स्वतःला नकळत दीर्घ सुस्कारा टाकतात. मग कुणी कण्हू लागतं. कुणी गुलाबांचा खोल वास घेत पडून राहतं.

पण सगळयांच्याच दृष्टीनं वातावरणातील हवाहवासा वाटणारा सगळा सुगंध अरुणेबरोबर निघून गेलेला असतो. आता इथून दिवस-भर उरते ती इस्पितळाची दगडी इमारत. औषधांचे कडू डोस. स्पिरीट आयोडिनचे दर्प. इंजेक्शनच्या सुया. यातनांचे असह्य ओरखाडे अन् इतर परिचारिकांचे खप्पड मुखडे.

★★

सगळयाँ वॉर्डातून फुलं वाटण्याची आपली 'ड्यूटी' आटोपून, अरुणा झटकन् इस्पितळाच्या जनरल विभागातून बाहेर पडते. आणि प्रसूती विभागात येते. सुटकेचा निश्वास सोडते. आता उद्या-पर्यंत या पुरुषांच्या लंपट नजरांशी आपला संबध येणार नाही, आणि विशेषतः डॉक्टर सान्यांच्या आसपास आपल्याला फिरकावं लागणार नाही, या विचारानं तिला बरं वाटतं—

अरुणेनं डॉक्टर सान्यांची प्रथमपासूनच धास्ती घेतली होती. सान्यांच्या आकर्षक देखण्या व्यक्तिमत्त्वाभोवती अनेक प्रवाद सळसळत होते. अनेकांच्या कडून सान्यांच्याबद्दल तिनं काही बाही ऐकलं होतं. खरं तर ती या इस्पितळात नोकरी धरणारच नव्हती. पण जेव्हा तिला समजलं, की इस्पितळातील स्त्री विभाग आणि प्रसूती विभाग हा सर्वस्वी वेगळा आहे आणि तो सगळा विभाग सानेबाईच चालवितात, त्या विभागाशी डॉक्टर सान्यांचा काहीही संबध येत नाही, तेव्हा धाडस करून तिनं डॉक्टरीणबाईंची भेट घेतली. त्यांनाही एका शिकावू नर्सची जरूरी होती. अरुणेला त्यांनी नेमून घेतलं. तिच्या घरची सगळी हकिगत सहानुभूतीनं ऐकून घेतली. आणि मग अरुणेनं न मागता एक महिन्याचा तिचा पगार आधीच त्यांनी तिच्या हातावर ठेवला. दवाखान्याच्या आवारात सानेबाईना 'आई' या नावानं कां संबोधतात, याचं रहस्य अरुणेला उलगडलं. तिच्या घरची बंद पडण्याच्या बेतात आलेली चूल बाईंच्या कृपेनं फिरून पेटू लागली.

सानेबाईंच्या छायेत अरुणा निर्धास्तपणे वावरू लागली. मऊमऊ लखमाली हिरवाळीवरून, एखाद्या बागेतून सहल करावी तशी आणि तरीही तिला अचानक पायात काहीतरी सळसळल्याचा भास होई. डॉक्टरांच्या संबंधी तिच्या शेजारपाजारचे लोक बोलत, ते, फार चमत्कारिक होतं. एकदा शेजारच्या शामरावनी तिला सहज म्हणून विचारलं होतं:

'काय अरुणा काय म्हणतात डॉक्टर ?'

'माझा आणि डॉक्टरच्या जनरल विभागाचा कधी संबंधच येत नाही. अजूनपर्यंत मी त्यांच्या विभागात पायसुद्धा टाकला नाही कधी.'

'अग तू टाकला नसलास, तरी ते तुम्हा नर्सांना भेटायला येत असतील ना?'

'तुम्ही काहीतरीच काय बोलता काका. डॉक्टर कशाला येतील नर्सेसशी बोलायला. कधी कामच असलं एकाद्या नर्सकडं तर 'ताई' म्हणून हाक मारतात आणि ते पण डॉक्टरीणबाईंच्या समोरच.'

यावर कुत्सित हास्य करीत शामराव म्हणाले होते,

'ताई म्हणतात ना ? म्हणणारच. म्हणायचं ताई, आणि करायची घाई. पोरी तुझ्यापुरतं सांगून ठेवतो. चुकून सुद्धा तू त्या इसमाच्या नजरेला पडू नको हो.'

ह्या प्रकारचे उद्‌गार ऐकले की वाटे, द्यावी सोडून ही नोकरी. पण कसं शक्य होतं ? चार बाकटचा धाकटचा बहिणींच्या पोषणाचा भार तिच्यावर होता. आईला अखेरच्या क्षणी अरुणेनं सांगितलं होतं, 'आई मी मुलीचं करीन तू काळजी करू नको.' तेव्हाच तिनं डोळे मिटले होते. जन्मभर बसून खाल्लेल्या आण्णांच्या हातून या पुढेही काही होणं शक्य नव्हतं. त्यांचा इनामदारी तक्क्या सुटणं अशक्य होतं. अरुणेलाच राबणं भाग होतं. आणि डॉक्टरांच्याबद्दल लोक काही म्हणाले तरी डॉक्टरीणबाईंच्या भलाईबद्दल तिची खात्री पटली होती. ती माऊली आपल्यावर कधी वेडावाकडा प्रसंग येऊ द्यायची नाही.

हळू हळू अरुणा दवाखान्याच्या वातावरणाशी सरावत होती. आणि एक दिवस, सकाळी रोग्यांना फुलं वाटणारी कोकिळाबाई नर्स नोकरी सोडून निघून गेली. तिचं काम बाईंनी 'अरुणाताई'कडं सोपविलं. अरुणेला नाही म्हणायचं धाडस होईना. मनातल्या मनात तिला भीति वाटली. कारण फुलं वाटायची ती जनरल विभागात. म्हणजे डॉक्टर सान्यांच्या विभागात आणि. . .पण बाईंनी सांगितलेलं काम नाकारणं अरुणेला सर्वस्वी अशक्य झालं. पण त्याक्षणी तिनं ठरवून टाकलं, की लौकरात लौकर दुसरी नोकरी बघायची. शाळेत. जमलं तर मुलींच्या शाळेतच.

पण गेल्या चार महिन्यांच्या अनुभवानं अरुणेला आता असंही वाटू लागलंय् की, आहे ही नोकरी कशासाठी सोडायची ? डॉक्टर सान्यांच्याबद्दल लोक काही बाही बोलतात म्हणून ? पण लोक काही म्हणाले, तरी आपला स्वतःचा अनुभव काय आहे ? गेल्या चार महिन्यात डॉक्टर सान्यांनी आपणहून एकदाही बोलण्याचा यत्न केला नाही. आपल्याशीच काय, कुठल्याच नर्सशी ते कामाशिवाय बोललेलं आपण पाहिलं नाही. बाईंनीच बोलावणं पाठविलं, तर ते







प्रसूती विभागात येतात. मुद्रेवर प्रसन्न हास्य असं. एखाद्या देवदूताच्या चेहऱ्यावर असावं तसं. बाई विचारतील, तेवढ्या कामा पुरतंच बोलतात. कधी कुणी नर्सबद्दल फाजील उत्सुकता नाही, की जादा बोलणं नाही. काम झालं की त्याच प्रसन्न मुद्रेनं फिरून जनरल विभागाकडं निघून जातात. जाताना मागं वळून देखील पहात नाहीत. खरं म्हणजे त्यांचा बंगल्याकडं जाण्या-येण्याचा मार्ग प्रसूतीगृहाच्या व्हरांड्यातून जातो. पण जाताना अगर येताना चुकूनही ते इकडं तिकडं बघत नाहीत. कुणी नोकरानं अगर नोकराणीनं मुजरा केला, तर मान किंचित् लववून स्टेथॅस्कोप घेतलेला हात वर उचलतात. आणि दर गुरुवारी दवाखान्यातील सर्व रूग्णाना, नोकरचाकराना साईनाथाचा प्रसाद म्हणून पेढे वाटतात. अशा सभ्य, धार्मिक वृत्तीच्या माणसाबद्दल लोक हवं ते कसं बोलू शकतात ? नाही त्या कंड्या कशा उठवू शकतात ? तसं काही असलं तर डॉक्टरांच्या नजरेत, हालचालीत ते दिसल्याशिवाय कसं राहिलं असतं? छे: डॉक्टर तसे नाहीत. लोक खोटं बोलतात. डॉक्टरांच्या कुणीतरी वैऱ्यानं या सगळ्या अफवा पसरविल्या आहेत.

आणि परवाचा आपला अनुभव काय सांगतो ? ऑपरेशन थिएटरमधला. बाई ऑपरेशन करीत होत्या. डॉक्टर शेजारी उभे होते. आणि आपल्याला चक्कर येऊ लागली. तसं डॉक्टरनी सावरलं. त्या बेशुद्धीच्या अवस्थेतही आपण डॉक्टरच्या स्पर्शापासून दूर राहाण्याचा प्रयत्न केला. डॉक्टरानी शान्तपणानं आपल्याला दुसऱ्या नर्संच्या हाती सोपविलं पण तेवढ्या दोनचार क्षणात त्यांचा जो स्पर्श आपल्याला झाला तो पापी हाताचा वाटला काय ? जग म्हणतं तसे डॉक्टर स्त्रीलंपट असते, तर त्या अवस्थेतही त्यांची बोटं आपल्या पाठीवर रुतली असती. पण तो स्पर्श पापी माणसाचा नव्हता. दुसऱ्या दिवशी व्हरांड्यातून येताना ते आपल्याला दिसले तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावर नेहमीचंच प्रसन्न हास्य होतं. ते एकच वाक्य आपल्याशी बोलले 'काय अरुणाताई प्रकृती ठीक आहे नं ?' पापी माणूस इतका निर्भय, इतका अविचलीत राहू शकेल ? शक्य नाही. शक्य नाही. डॉक्टर तसे नाहीत.

डॉक्टरांच्याबद्दलची अरुणेच्या मनातील धास्ती नाहीशी झाली. सुरवातीला आजूबाजूला डॉक्टर आहेत या जाणीवेनं त्यांच्या नजरेआड होण्यासाठी ती कुठल्यातरी खोलीत दडून बसे. पण आता तसं करण्याची जरूरी वाटेना. प्रथम ड्यूटी म्हणून पत्करलेली फुलं वाटण्याची कामगिरी अरुणा आता हौसेनं करू लागली. अशीच फुलं वाटताना एक दिवस डॉक्टर तिला समोरासमोर भेटले. नजरेला नजर भिडली. तेव्हा तिची खात्री पटली की, डॉक्टरांच्याबद्दल जे बोललं जातं ते संपूर्ण खोटं आहे. त्यांच्या डोळ्यात एक विलक्षण शान्त, पवित्र असं काही तरी तेवत असलेलं तिला दिसलं. धीर देणारं. कौतुक करणारं. वत्सलतेनं, पित्याच्या ममतेनं पाठीवरून हात फिरविणारं--प्रथम प्रथम रात्रपाळीची वाटणारी भीतीही आता वाटेनाशी झाली.

आणि तसं पाहिलं तर अरुणेनं पित्याच्या ममतेचा कुठं अनुभव घेतला होता? आण्णा तिचे जन्मदाते वडील होते. पण बस् एवढंच. पित्याच्या मायेचा असा अरुणेला काय अनुभव होता ? तिच्यावरच काय घरातल्या कुणावर आण्णानी कधी माया केली होती ? आण्णांच्या विचारानं अरुणा बधीर होई. तिचं मस्तक सुन्न होई.

होतं नव्हतं ते विकून खाण्यापलीकडं आणि एकापाठोपाठ सहा पोरींना जन्म देण्यापलीकडं, उभ्या हयातीत काय केलं आण्णांनी? आई बिचारी बाळंतपणाखाली पिचून पिचून गेली. अखेर सहाव्या बाळंतपणात तिचा अन्त झाला. सगळी गल्ली हळहळली. पण आण्णा काही कुठल्या पोरीला पोटाशी धरून, 'पोरी तुझी आई गेली ग ऽ' म्हणून रडले नाहीत. आल्या गेल्या देखत ते धोतराचा सोगा डोळ्याला लावीत. पण खरं तर त्यांच्या डोळ्याला पाण्याचा टिपूस आला नसेल. परमेश्वरानं आण्णाचं मन असं कसं कोरडं ठणठणीत ठेवलं?

आईला पोचवून आल्यावर, शेजाऱ्यांनी आणून दिलेला चहा आण्णा घटाघट प्याले. लहान लहान मुलींना शेजारच्या मावशींनी भरवून आणलं. आपल्यासाठी आणि रागिणीसाठी अन्न आणून ठेवलं. आई जाऊन पुरते आठ तास सुद्धा झाले नव्हते, तर अन्नावर वासना जाणार कशी ? आपण अगर रागिणीनं खाण्याचा विचारही केला नाही. पण निजानीज झाल्यावर आण्णा हळूच स्वयंपाकघरात आले. आणि छान पाटावर बसून त्यांनी सगळं अन्न व्यवस्थित संपविलं. माजघरातल्या अंधारात बसून आण्णांच्या तोंडाचा मचक् मचक् आवाज आपण स्वच्छ ऐकला. त्यांची ढेकर ऐकली. आणि रोजच्याप्रमाणं त्यांचं घोरणंही ऐकलं.

## महाभयंकर धरणीकंप

**१८ व्या शतकात जॉन मिचेल या केंब्रिज विश्वविद्यालयातल्या भूगर्भशास्त्रज्ञाने इ. स. १७५६ च्या सुमारास आपला भूकंपावरील एक ग्रंथ प्रकाशित करून या शास्त्राला एक सुसंगत अशी सुरुवात केली. त्याच्या त्या ग्रंथात इ. स. १७५५ मधे लिस्बन येथे झालेल्या महाभयंकर धरणीकंपाचा उल्लेख आहे तो असा.**

**ता. १ नोव्हेंबर १७५५ रोजी पोर्तुगालच्या किनाऱ्यावर धरणीकंपाचा महाप्रचंड हादरा बसला. अटलांटिक महासागरातील तो एक अत्यंत विध्वंसक धरणीकंप होय. त्यामुळे साऱ्या लिस्बन शहराची भयंकर नासधूस झाली. असे सांगतात की उत्तरेस स्वीडन, स्कॉटलंडपासून दक्षिणेस मोरोक्कोपर्यंत व पूर्वेस जर्मनीपासून तो थेट पश्चिमेस वेस्ट इंडिजपर्यंत त्याचे हादरणे साऱ्यांच्या ध्यानात आले. मोरोक्को विभागातले १०,००० लोकवस्तीचे एक गाव पृथ्वीच्या पोटात केव्हाच गडप झाले. समुद्रात उफाळलेल्या प्रचंड लाटांमुळे प्रत्यक्ष लिस्बन शहराची अतोनात हानी झाली. सागरात उसळलेल्या या पर्वतप्राय लाटा तर इंग्लिश खाडीपर्यंत व वेस्ट इंडिजकडेही सर्व किनाऱ्यावर जाऊन थडकत. एवढंच काय पण असं सांगतात की स्कॉटलंडमधील सरोवरात सुद्धा या महाप्रचंड धक्क्यामुळे मोठमोठ्या लाटा उसळल्या होत्या.**

अनुक्रमणिका








असला कसला हा माणूस. आणि नेमका असलाच माणूस आपल्या वाट्याला बाप म्हणून कां यावा ? एखाद्या पशूत आणि आण्णांच्यात फरक काय ? आईला तर त्यानी घोसळून घोसळून मारलं. किती नाजुक आणि देखणी होती. . . पण आण्णा एक दिवस तिच्याशी कधी मायेनं वागले नाहीत. बायकोशी बोलायचं म्हणजे तारातारीनं बोललं पाहिजे म्हणून आण्णांना कुणी शिकविलं ? आणि आम्हा मुलींशी तरी कधी प्रेमानं वागले ? जरा कुठं दंगा केला म्हणून सीमेला परवा त्यानी कानफाडात मारली, तर गालावर पाच बोटं उठली. आपण मधे पडले नसतो तर त्या दिवशी सीमेची काही धडगत नव्हती. आई वेगळ्या पोरी, असं कधी मनातही येत नाही त्यांच्या. कसं येणार ? आण्णाना मन असेल तर नं? त्यांना फक्त शरीर आहे. आणि तेही पशूचं.

तेच डॉक्टर. परमेश्वरानं त्याचं मन इतकं प्रेमळ कसं घडवलं ? गरिबातल्या गरीब पेशन्टशीही डॉक्टर प्रेमानं बोलतात. दवाखान्यात येणाऱ्या लहान मुलांच्या पाठीवर मायेनं हात फिरवितात. तेवढ्यानंच रोग्यांचं निम्मं दुखणं नाहीसं होत असेल. त्यांना केवढा धीर आणि आधार वाटत असेल.

आणि अरुणेला वाटू लागलं. डॉक्टरनी आपल्या पाठीवरून असाच पित्याच्या मायेनं हात फिरवावा म्हणून आपण आजारी पडावं. एक दिवस फुलं वाटून झाल्यावर, ती धाडस करून डॉक्टरांच्या खोलीत शिरली. डॉक्टर खोलीत नव्हते. तिची निराशा झाली. चार टपोरी गुलाबाची फुलं भक्तीभावानं डॉक्टरांच्या टेबलावर ठेवून ती बाहेर पडली. काम संपवून घरी परत जाताना, बाबल्या मेहतरानी अरुणेच्या हाती एक पुडकं दिलं आणि म्हणाला, 'घरी जाऊन उघडून बघायला सांगितलंय् डॉक्टरनी.' अरुणा घरी आली. अधीरतेनं पुडकं सोडून पाहिलं. गुलाबी आणि पोपटी रंगाच्या दोन भारी साड्या आणि बहिणीच्या परकर पोलक्यासाठी कापडं होती.

अरुणा तशीच देवघरात आली. ती सगळी कापडं आईच्या तसबिरीपुढं ठेवून म्हणाली, 'तू गेलीस आणि मी पोरकी झाले होते. आण्णा असून मला त्यांचा आधार कधीच वाटला नव्हता. पण आई, आता मला वडिलांची माया मिळालीय्. आधार मिळालाय्. तू आता माझी मुळीच काळजी करू नको. उभ्या जन्मात आण्णानी माझी जी हौस केली नाही ती आज डॉक्टरनी केलीय्.'

★ ★

डॉक्टरीणबाई एका महत्त्वाच्या कामासाठी परगावी गेल्या होत्या. अरुणेची रात्रपाळी होती. शेवटचा एक राऊंड घेऊन रात्री साडे अकराच्या सुमारास डॉक्टर झोपायला जात. पण आज बारा वाजले, तरी ते घरी गेल्याचा, त्यांच्या बुटाचा आवाज फरशीवर उमटला नव्हता. तेरा नंबरच्या खोलीतल्या बाईला, औषधाचा डोस पाजून आणि तिचं टेंपरेचर घेऊन, नुकतीच अरुणा परिचारिकांच्या खोलीत आली. आरामखुर्चीवर पडली. तिला पेंग येऊ लागली. डोळे मिटू लागले. आणि अचानक ती दचकून जागी झाली. खडबडून उभी राहिली. डॉक्टर साने दारात उभे होते. मागच्या मागं दार बंद करून घेत होते. त्यांच्या चेहऱ्यावर नेहमीचं हास्य होतं. पण डोळ्यात काही वेगळा भाव असावा असं झटकन् अरुणेला जाणवलं. तरीही तिला नीटसा अर्थबोध होईना. ज्याला प्रेमळ पिता मानलं, तोच काही वेडाचावाकडचा नजरेनं आपल्याकडं पहात पुढं येत आहे हे तिच्या मेंदूत शिरूच शकत नव्हतं. एखाद्या रोग्याला तपासण्यासाठी यावं तितक्या सहजपणानं डॉक्टर तिच्या पुढ्यात येऊन उभे राहिले. म्हणाले,

'माझी खात्री होती अरुणा, की एक दिवस तू माझ्याकडं फुलं घेऊन येणार म्हणून. पण त्यादिवशी माझी पाठ पडली नाही म्हणून तू नर्व्हस झालीस. होय ना ? हा बघ मी आलोय् तुझे गुलाब स्वीकारायला.'

त्यासरशी अरुणा एकदम मागं सरकली. मागच्या भिंतीला पाठ टेकल्यानंतर तिला अधिक मागं जाताच येईना. डॉक्टरच्या तोंडाचा ब्रँडीचा वास तिच्या मस्तकात शिरला. डॉक्टर आपल्या खऱ्या रूपात आपणासमोर उभे आहेत, या जाणीवेची वीज तिच्या सर्वांगात शहारली. भीतीनं तिचे डोळे ताणले गेले. तोंड विस्फारलं गेलं. बोटं काकडलेला थरथरता हात डोळ्यावर गेला. एखाद्या प्रचंड नागसापाच्या फण्यासमोर उभं रहावं, आणि त्यानं अंगावर झेप घेण्याच्या पवित्र्यात फुत्कार करावेत तशी अरुणा भेदरली. पण तिच्या कंठातून किंकाळीच फुटेना. वाटलं हे स्वप्न असेल. आपल्याला जाग येईल. अजून जाग येईल. पण अरुणेच्या ध्यानात आलं, की इतके दिवसच आपण स्वप्नात होतो. या क्षणी मात्र जाग आली आहे. डॉक्टर जड जिभेनं म्हणताहेत,

'अगं इतकं घाबरायला काय झालं.... पातळं आवडली नाहीत का तुला ? खरं म्हणजे तू कसलेही कपडे घातलेस तरी सुंदर दिसतेस. आणि अजिबात कपडे घातले नाहीस तर. . . ओ : ब्यूटिफुल... अरुणा आतापर्यंतच्या कुठल्याही स्त्रीपेक्षा तू मला आवडलीस. फार फार आवडलीस. . . तू हवीस मला. . . '

अरुणेला म्हणायचं होतं,

[पृष्ठ २२ वर पाहा]




महाराष्ट्राने 'गोवर्धन' पर्वत उचलला !

ए पोरे, गप्प बस,
मानसानं किती म्हाजूरीपना
करावं ग ऽ
मी एवडा फुडारी मानूस....



# अक्षि, परजासत्ताक दीणच म्हना !

—अशोक परांजपे



[ **प्रार्थना** – "मंडळी ! नमस्ते! कधी मधी, सहज फावला वेळ असला नि सातारा–कराडच्या बाजूच्या रस्त्यानं फिरलात; रस्त्यानं म्हटलय वरं का, 'टार-रोड'नं नव्हे ! तर धुळीनं भरलेल्या पायानं आणि आळसावलेल्या शरीरानं उभ्या असलेल्या 'बोरी-नि-बाभळी' तुम्हाला दिसतील. तुमच्या धुराळलेल्या चेहऱ्यावर थोडसं हसू उमटेल. आणि इतक्यात कुजबुजल्यासारखं बोलणं ऐकायला येईल. "हे कोण वरं ?" असा प्रश्न पडेल. अहो ! दुसरं कुणीही नाही. ही बोर बाभळीच्या कानात कुजबुजते आहे. एवढ्या जिवाभावाच्या मैत्रिणी! बोलणारच की; त्यांच्याच बोलण्यातला प्रस्तुत विषय. वस्तुत: देशभर हे असंच चाललय. जिथं तिथं हीच कुजबुज. कुणी 'पॉलिश्ड लॅंग्वेज'मध्ये, कुणी 'पॉश' पेहरावात, तर कुणी 'उचल्या-संस्कृती'त स्वत:ला बुडवून 'देशभक्ती'चं सोंग सजवतो आहे. इथं आहे रांगडी भाषा ! पण अखेर हेही सोंगच ! इथं खरं कुणावरच टीका अभिप्रेत नाही. तुम्ही आम्ही घ्यायचा आहे फक्त प्रत्यय ! इतकंच. चला आता अपारगावात जरा चक्कर मारूया. ]

(**दृश्य पहिले** :– अपारगांवचा सूर्या क्षितीजावरच विसावला आहे. रामा जांबळीकराचं हाटील उघडून अर्धातास झाल्याला हाय. हाटीलाबाहीरच्या कट्ट्यावर, (सुमारे ३'×५') कपाळावर नाम लावले आहेत. चेहरा इरसाल, पिळदार पटका, पैरण, धोतर, अशी खास वैशिष्टचे असलेला महाद्या न्हावी वस्तरा पाजळून तयार आहे. त्याच्या पुढ्यात अप्पुराव पाटील, सरपंच, अपारगाव, हे दाढी करवून घेण्याच्या इराद्यानं बसले आहेत. चेहऱ्यामोऱ्यावरून माणूस 'बेरकी वरं का !' असंच इंप्रेशन व्हावं, असा हा प्राणी आहे. सरपंचाच्या हातात एक गोलाकृती आरसा आहे. त्यात आपला रुबाबदारच






अनुक्रमणिका

म्हणायला हवा असा चेहरा न्याहाळता न्याहळता, चेहऱ्याला लांब रुंद, गोलाकार तणावे देऊन "ऽसं काय तिसतयाऽऽच्या बायला म्हातारा झालु वर कांऽऽ" असं भाषांतर करता येईल असे उसासे ते टाकत आहेत. इतक्यात सुरवातीलाच म्हाद्याचा वस्तरा 'जरा लागल्यागत' होतो. आणि मग काय सरपंचच तो, रागावतो. आणि मग संवादाला रंग भरायला लागतो.)

**सरपंच**:– आयला ! ! म्हाद्या हजाम कां ढोरं रं तुमी आँ ! आयला अगदी पैसं देत नसल्यावाणी अक्षि बिनपान्याची करतुयास की आँ ! !

**म्हाद्याः**– ह्ये पानी हाय न्हवं ! पर मालक ! चुकूण हात चळबाळला झालं.

**सरपंच** :– चुकूण, येकदा का काय ? हजार येळा दाडी केलीयास मर्दा ! उगीच कायतरी बोलायचं म्हंजी !

**म्हाद्याः**– म्हनुनच चळबाळला कि मालक ! खोटं का काय ? आपुन त्यातलं न्हवं वरं का !

**सरपंचः**– (चिडून) म्हनून चळबाळला, हाय काय ह्येऽ

**म्हाद्याः**– (संकोचत, पण धीर करून) त्याचं आसं हाय. . .

**सरपंचः**– आँ !

**म्हाद्याः**– न्हाई म्हंजे त्याचं आसं हाय, ऽऽ कि हजार दाड्या झाल्या तरी पैसं आल्यालं न्हाइत अजूण (वस्तरा हातावर चटपटीत राहतो).

**सरपंच**– वा रं माज्या वागाऽऽ मर्दा हजार केसं हायती का माज्या दाडीला ? उगच आपला मणाला इल त्ये बोलायचं म्हंजी ! काय मानसं मर्दा तुमी !

[ इतक्यात सेक्रेटरी साहेब, धावत पळत येतात. धुवट पांढरा, सदरा व लेंगा, (लेंगा रात्रीच धुतल्यामुळे वाळलेला नाही. तसाच घातलेला आहे.) सरळ घडीची पांढरी टोपी. चेहऱ्यावर नम्र भावाची कमाल. आणि आपल्यावर देशाची फार मोठी जबाबदारी आहे ही जाणीव अवघी देहयष्टी व्यापून राहिली आहे, असा भास पहाणाऱ्याला खचित व्हावा. म्हाद्या त्यांच्याकडे पहात बोलतो. ]

**म्हाद्याः**– सकळी, सकळी, लक्ष्मनराव. कुटं पळल्यात ?

**सरपंच**– आँ ! लक्षिमनराव का काय याऽ काय म्हत्वाच काडलंय आज ऽ ?

(सेक्रेटरी– (आदबपूर्वक हसतात.) ते स्वतः नुकतेच एस्. एस्. सी वगैरे पास झाल्यामुळे, आपली भाषा 'दादोबा पांडुरंगा'बरहुकूम आहे अशी त्यांची रास्त समजूत आहे. ती भाषागंगोत्री शक्य तितकी आतं पवित्र ठेवण्याच्या महान हेतुमुळे, अतिकष्टी होत्साते सेक्रेटरी बोलायला सुरवात करतात.)

**सेक्रेटरी**:– आज देशाच्या दृष्टीणं, अत्यंत महत्वाचा क्षन ! क्षना क्षनानी, मिणिटा मिणीटाणी, युगा युगाणी, जवळ येत आहे. त्यंन्हा (कचरतो. भांबावून इकडे तिकडे पहात) तेऽव्हा मी आपल्याला इणंती करन्याची इच्छा करतो कि, म्हंजी संक्षेपात इणंती करतो कि (सरपंचाना हा प्रस्ताव मुळीच आवडत नाही ते चिडून विचारतात.)

**सरपंच**– आयलाऽ काय मानस रं तुमी ! उगच मर्दा इणंती ! इणंती ! हाय काय नि न्हाय काय ? हं ऽ आता बोला बगू ऽ ऽ येवढीशी गोष्ट अनिक हा ! ऽ

**सेक्रेटरी** – (परोखरीच ओशाळून) आज सव्वीस जाणेवारी, भारतासारख्या, अखिल भारतीय देशात, मोठ्याऽ

**सरपंच**– मोठ्या त्यो काय मानूस हाय का ? महाण म्हना महाण ! हं ऽऽ तुमाला भाषान याचं कवा ? हं !

**सेक्रेटरी**– हा ! अखिल भारतीय देशात महाण असलेल्या देशाचा 'प्रजासत्ताक दीण' जय भारतमाता की ऽऽ आज 'रोजी सकाळी ठीक ९।। वाजता हाय ऽऽ

**सरपंच**– वरडू नगा हो ! अरं पर पंचागण बघितलं का ! आपलं हाय ! म्हनून त्वांड वासून सांगताय, आनि त्ये बी सकाळी ऽ मग काल कळवाय काय ताप भरलावता व्हय ऽ

**सेक्रेटरी**– तसं नव्हे ऽ पन काल आपुन, मामलेदाराबरोबर तमाशाला गेलावताऽऽ आनिऽ

**सरपंच**– देसकार्य म्हंजी लोकणाटच आलंच,

**सेक्रेटरी**– न्हाई आनि रातभर ऽऽ बी

**म्हाद्या**– (खांकरून) रातभर ऽऽ जागून बी देसकार्य काय संपतया व्हय ! न्हाई वो मालक ऽऽ अवो ती काय सादीसुदी कामदारी हाय व्हय – (डोळा मारतो)

**सरपंच**– (चपापतो) रातभर ऽऽ कुटं न्हानार मर्दा म्हनून तालुक्या-लाच न्हायलो मी आनि सायेब ऽऽ

**म्हाद्या**– ह्यानडांव, चन्द्रीकडं, कां म्हनना ऽ ?

**सरपंच**– (एकदम ओरडून) आयला म्हाद्या ऽ दाडी कर बगूऽऽ मानसाण कर्तव्याला सोडणं काय वरं न्हवंऽऽ बरं काऽ त्या बिचाऱ्या मोर्चा काडनार व्हत्या ऽ

**म्हाद्याः**–! तर कायऽ आता आपुनच बगा कीऽऽ आपुन व्हता म्हनून गप्पगार बसल्या. उगीच दुसऱ्याला. . .

**सेक्रेटरी**–(मध्येच) म्हनून आपल्याला प्रोग्राम कळवता आला नाही. यावद्दल क्षमेची माफी असावी.

**सरपंच**– मापी मी केलीया, क्षमेचा आपल्याला अदिकार न्हाय, वरं उगच लई गीत गाऊ नगा, (इतक्यात म्हाद्याचा पुन्हा वस्तरा लागतो) आयला म्हाद्या पुन्ह्यांडाव त्येंच काय ? काय मर्दा मानस तुमी; शेवा म्हनून काय न्हाईच ! बर शेक्रेटरी "परजासत्ताक दीणाचं" काय करावं म्हनताय तुमी ऽऽ

(सेक्रेटरी बोलणार इतक्यात म्हाद्या आपली टकळी सुरू करतो.)

**म्हाद्या**– मालकऽ 'परजासत्ताकदीण' ही काय भानगड हाय ? हाय काय उगीच गोंधुळ. बरं येक वर्साला झाला न्हो, दरवर्षी आपलं हाईच !

**सरपंच**– कल्यान ! घ्या भानगड ! काय मर्दा मानसं तुमीऽऽ ढोरं बरी दिसला असता कि, अरं ऽऽ जी 'परजाऽऽ'

**म्हाद्या**– म्हंजी कोन ?

**सरपंच**– तू, मी, ह्यो शेक्रेटरी, ढोरं, गाडाव, घोडी, कुत्री आनि सर्वे मानसं, म्हंजी 'परजा'.

**म्हाद्या**– असं व्हय, मी म्हनलं का 'येकलं तुमी'च आनि आमो 'मत्ताक' का काय 'त्ये'









## झुला

श्वासांत श्वास गुंफल्यावर
सुरानें सूर पेटल्यावर
उरते अवस्था एकच
तीव्र दारुण दुराव्याची
कळी मिटून घेण्याची
दोन्हीतही एक अशब्द गत
एक अनवट घनगर्जित
एक विलक्षण ताण –
एक असलेपणाचा, दुसरा नसलेपणाचा
एक थरथरता, दुसरा हुरहुरीचा
मधें कोमट सहानुभूतीचा झुला —
झुला, दयेचा झुला–
आज मोडुन टाकु दे मला.

—पद्मा लोकूर

**सरपंच**– (मनोमन चिडून) आयलाऽ असं कसं हुईल 'सत्ताक' म्हंजी अदिकार म्हनल्यालं हाय अर्थात, तवा 'परजेच्या अदिकाऱ्यांचा म्हंजी आमचा दिवस' असं अर्थात म्हनत्यात !

**म्हाद्या**–! 'अर्थात म्हनत्यात' म्हंजी काय आरथ घ्याणात इना व्हं!

**सरपंच**– तू उगीच दाडी कर गुमान वघू ! शेक्रेटरी मंग, काय काय आरिंजमेन्ट हाय ? हुंद्या येकदा सटा, सटा...

**सेक्रेटरी**– तसं नव्हे ! परंतु पहिल्याणें शाळेच्या आवारात विद्यार्थ्यांच्या कडून झेंडावंदण होईल.

**सरपंच**– ती करत्याल हो ! आयला माकडच ती, मास्तर सांगल त्ये करत्याल अक्षि दोन बोट जादा ! !

**सेक्रेटरी**– त्याणंतर, शाळेच्या विद्वाण माजी विद्यार्थ्याचं भाषन, त्याला मार्गदर्शण म्हणून होईल ?

**सरपंच**– त्ये कुनाचं ?

**सेक्रेटरी**– (थोडा लज्जित होऊन स्वत:शी हंसतो) या शाळेचा णामवंत माजी विद्यार्थी या णात्याणं मलाच हे भाषन करावं लागेल असं सर्व जनाचं सार्वजणिक मत अजमावूण मी ह्या निर्णयाप्रत आल्यालो-हाय !

**महाद्या**–हा ! काल म्हनूनच मास्तरास्नी कधी नव्हं त्ये चॉय पाजला वाटतं लक्षिमनराव ऽऽ वा (लक्ष्मणराव सेक्रेटरी अतिशय ओशाळतात) वाकी मालक, लक्षिमनराव वाकी त्या कामात उषार मानूस बरं कां! (लक्षिमणरावना काहीच सुचेनासं होतं. मग महाद्या टोन बदलीत बोलतो) अवो वाषन देण्याच्या कामात कुनि हात धरनार नाय बरं का ? (इतक्यात वस्तरा पुन्हा लागतो.) काय हयगय न्हाई वोलन्यात.

**सरपंच**– पुरं रं तुजं. उगीच म्हुस वोडायला लागल्यावानी करतुयास त्ये !

**महाद्या**– रेडा तर म्हना कि मालकऽऽ तसं कसंऽ (हसतो)

**सरपंच** (हंसता हंसता, रागावत) आयला न्हावड्याऽ तू बी बाषन देनार म्हन कि, जरा गप्प वस. या राज्यात जो त्यो उठतो कि भाषन सुरुच ! शेक्रेटरी तुमचं वाषन वाचूण दावा बरं !

**सेक्रेटरी**– (अतिशय समाधानी मुद्रेने खिशातील कागद काढीत) नेहरूणी, गांधीणी, आनि अप्पुराव पाटील सरपंच याणीऽ

**सरपंच**–! आयला, चव्हाणानी, मदी म्हना कि रावऽ

**सेक्रेटरी**– बरं; नेहरूणी, गांधीणी, चव्हाणाणी, आनि अप्पुराव पाटील याणी ऽऽ या देशाला जीवण ऽ ऽ दाण–

**म्हाद्या**– जीवणाची प्राणादान उडविली हाय. असं द्या की ठोकूण मर्दा ! त्याला काय व्हतय !

**सरपंच**– (खेद व्यक्त करीत) पयलं वाशन चुकल्यालं हाय, अद्यक्ष म्हाराज, गुरुजण, आनि माझ्या बालमित्राणो, आनि मैत्रिणीणो, ह्ये शाफ व्हायलं आनि...

**सेक्रटरी**– अवो त्ये इथं चालायचं न्हाई.

**सरपंच**– कां पांगळं हाय का त्ये ! आमच्या गनध्यानऽ

**महाद्या**– लई उषार पोरगाऽ अवो ४ थींत असताणाच कॅप्स्टण वडणार आनिऽ

**सरपंच**– गप्परं ऽऽ पर त्यानं लिवून दिलत मला शेक्रेटरी तुमची काय चारबुक जादा म्हना कि

**सेक्रटरी**– मी कुटं न्हाय म्हनतो ऽ पर

**सरपंच**– पर काय ऽ मर्दा णुसतं वोलायचं हायऽऽ वोलन्याला काय पैसं पडत्यात ऽ? म्हना ऽ वालमित्राणो आनि मैत्रिणीणो ऽ त्यो याख्याणाचा म्हंथळाच म्हनल्याला हाय ऽ वाषनचा ऽ

**सेक्रेटरी**– (गांहिवरून) माझ्या वालमित्राणो ऽ (मध्येच जीभ चावीत) तसं णव्हे ! गुरुजण आनि वालमित्रानो ह्ये काय चालनार न्हाई ! ह्ये काय शाळतलं भाषन नव्हे !

**सरपंच**– येवड्यान, कंट दाटला म्हना कि ! पुढं काय म्हनल्यालं हाय म्हनून दावा बरं ऽ गुरुजणास्नी हल्ली इंचारतय कौन म्हना ? (जांभई देतो)

**सेक्रेटरी**– (थोड्याशा उल्हासाने) आता पहिल्यापासून म्हनून दाखवतो. अद्यक्ष म्हाराज, आणि बंधुभगिणीणोऽ नेहरूणी, गांधीणी (सरपंच डोळे वटारतात) चव्हाणानी, आनि सरपंच अप्पुराव पाटील याणी याऽ देशाला जीवदाण दिल्यालं हाय, त्याणी कनाकनाणी तणू झिजवूण (सरपंच पोटावर हात फिरवतात) देशाला स्वातंत्र्य मिळवूण दिल्यालं हाय !

**म्हाद्या**– धंदवाल्या बायकांचा मोर्चा मोडून काडल्याला हाय म्हना कि राव ऽ येवडं म्हत्वाचं काम सोडताय व्हय !

**सरपंच**— त्ये आमी मर्दा ! गांधीणी गव्हं ! कुनाचं क्रेडिट मर्दा कुनाला ऽऽ तुला काय मर्दा ! ! रगत अटवाय लागतया अमास्नी, बाई म्हंजी सादी वस्तु हाय का ? काय मंडळीऽ!










सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे त्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान ण्यापूर्वी—
एका छोटया शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ..२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ज्ञांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
साहजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची काही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॉर्बेट बूट्स् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.
TOM & BAY SR/5068-M

**सेक्रेटरी**– पुढलं वाक्य लई चांगलं हायऽ म्हनून दा ' कां ? त्यांचं णाव अशेतु हिमालयापर्यन्त साऱ्या म्हाराष्ट्रात जगजाहीर झाल्यालं हायऽ

**सरपंच**- शाब्बास र मर्दा ! हथं खनानून टाळी व्हाया पायज्येल वर कांऽ सांगूण ठेवा साळतल्या पोरास्णी ऽ

**म्हाद्या**– आनो मास्तरास्नी तर अवेश्य सांगाय पायज्या वरं का ! न्हाइतर ही मास्तरडी नुसती गप्प बसत्याल ऽ

**सरपंच**– महाद्या, हाय कां त्वांड उग मधी मधी ऽ आनि अवो शेक्रेटरी ऽऽ त्या सदोबा कुलकर्न्याला

**सेक्रेटरी**– त्यो जाडगेला का काय ऽ?

**सरपंच**– हं ऽ त्यो हेडमास्तर कुलकर्नी, त्यला म्हनाव, तू बी जरा दाडीबिडी मारुण ये म्हणाव ऽ धुतल्याली कापडं घालूण ऽ न्हाईतर सदा येतो मर्दा जड भरतावाणी ऽ

**महाद्या**– तर काय, महिन्याभरात दाडीबी न्हाई, तरी मी म्हनलवत, गांवातल्या दोनचार मंडळीची, फुडारी लोकांची करतो, तशी फुकटात करतो, तरीबी गडी काय राजी न्हाई !

**सरपंच**– (चपापतो) हाय का ! आमी मर्दा कुंनच्या गडबडीत आनि तुला काय बाय सुचतया. शेक्रेटरी आनि पोरास्नीबी जरा नीट या म्हनाव, न्हाइतर येत्याल ती गेली न्हवती कां लंकला, तशीऽ माकडावानी

**सेक्रेटरी**– तसं णव्हे पन !

**सरपंच**– आयला तसं नव्हं ! तसं नव्हं ! हाय काय ! अडचन ! बोला तर बगू ?

**सेक्रेटरी**– गावात 'जणगन मण' म्हनारं कोन ? गुरवाचा बाळकृष्णा पंढरपूरला गेलाय, आनि हसबनीस मास्तर बी जत्रला गेल्यात ऽ गावात ही गानारी दोनच.

**सरपंच**– हसबनीसाची बायकु हाय ना ! तिला म्हनाव ऽ भाता वडून कसं ईल तसं म्हनाऽ न्हाइतरी आसऽ कोन ऐकतया त्ये 'जणगनमण आँ !

**सेक्रेटरी**– पन वहिणीणा गानं इल का ?

**महाद्या**– त्यात काय अवघड ? मास्तर रोज म्हनत्यात, तिणं बी ऐकलं आसलच कि !

**सरपंच**– म्हाद्या तुला काय कळतया व्हय त्यातलं ऽ आंऽ मर्दा उद्या तुज्या वायकुला हजामती कर म्हनलं तर करल का ? (क्षणभर थांबून) करल पर नुसत्या बोलन्यात–

**म्हाद्या**– (समजल्यासारखा मान हलवून) ह्ये वाकी खर वरं व्हो! मग 'जणगनमण' च फिसकाटलच म्हना कि !!

**सरपंच**– अरं त्यो गान्याचा इषय हाय ऽ रडनं आनि गानं बायकास्नी आपुसकच येतय, शेक्रेटरी तवा 'जणगनमण' च ठरेल. पर झेंड्याचं काय ऽ?

**सेक्रेटरी**– झेंडा भी हाय आपुन आनूया. गवसल त्यो.

**सरपंच**– वरं पंचायतकडं पैस हायती कां ? जरा झाडून घ्या मर्दा, येवडं बी ध्याणात येत न्हाईं व्हय !

**सेक्रेटरी**– आता अगदी म्हत्वाचं बोलनं न्हायलं.

**सरपंच**– वोलाऽऽ (महाद्या कान टवकारून ऐकत राहतो)

**सेक्रेटरी**– अद्यक्षम्हाराज कोन आनायचे ?

**सरपंच**– काय मर्दा मानसं तुमी ऽऽ आयला अद्यक्ष हाय काय न्हाय काय ? ह्यो म्हाद्या बी हुईल कां ?

**महादू**– मी ? आंक्षि वेष्टच म्हना की. (हरकतो)

**सरपंच**– (नाराजीनं) तू नव्हं रंऽ आपलं यक उदाहरन दिलं. अर त्येला काय ? अद्यक्ष म्हंजी लई सादी गोष्ट ! आपुन टेबलावर बसायचं न्हाईं ऽऽ खुर्चीवर बसायचं. बोलनारा हसला कि आपुन दात इचकायच, त्यो तावातावाणं बोलायला लागला कि टेबलावर हात आपटायचं. झालं. आमी किती सबास्नी झाल्यालो हाय मर्दा अध्यक्ष ! त्येला डोकं लागत कां काय ?

**सेक्रेटरी**– पर आज आपुन पाव्हने बोलावतो. दर वर्षी परमान, म्हनून आपला चान्स गेला.

**सरपंच**– मग मामलेदार सायेब हायतीच की मुक्कामाला अद्यक्ष गावला. त्यास्नी आसलं काय तरी पायिज्येच आसतया.

**सेक्रेटरी**– बरं आपलं भाषन . . . .

**सरपंच**– आपलं ठरल्यालं हाय व्ह (आवार मानणे) आंक्षि प्रोग्राम फिस झाला. आनि रातच्याला हाय काय ?

**सेक्रेटरी**– गद्रे गुरुजीचं प्रवचण ! गीतेवर.

**सरपंच**– काय मर्दा परवचण पोराकरता, मोठ्या मानसा-करता काय हाय ? कोलाटण्या सांगा, कोलाटण्या ऽ आंक्षि मामले-दारानं कोलांटीच खाया पायिज्ये.

**सेक्रेटरी**– पन त्यं आपल्या कार्यक्रमात बसणार नाही.

**सरपंच**– मंग कोलाटण्या काय बसूण व्हनार काय ? त्या कवा झालं तर नाचणारच. काय मर्दा मानसं तुमी

**सेक्रेटरी**– तसं णव्हे पन ऽ

यंदाची संक्रांत–



यंदा संक्रांतीचे मुख्य वाहन 'रेडा' आहे......



अनुक्रमणिका

**सरपंच**– पुन्हा तसं णव्हे हाय कां! ऽकाय मर्दा मानसं तुमी ऽ
**सेक्रेटरी**:– ते २६ जानेवारीला करनंद्दरं दिसनार नाही. आनि ठरावबी पास झाल्याला नाही.

**सरपंच**:– एवड्या, तेवड्याला ठराव, अवो मी सांगतोय नव्हं ? अवो सांस्कृतिक का काय म्हनत्यात त्याच्यात घालून टाका की रावऽ आनी मी सांगतो आता ही मेंबरबी न्हाई म्हनत्याल, पर राती, ह्यो योक, योक, पुढं, वाईपुढच्या वत्तीला हवा मारायऽऽ महाद्या तू वी जा ऽ मी वी घराकडं आलोच.

**महाद्या** :– असं काय तरी पायिजा बरं का मालक (शीळ ठोकून देतो) चलाव लक्षिमनराव ऽ.. ★★

**(दृश्य २रे)**:–[रंगमंचावर सभा चाललेली आहे. सरपंच, आपल्याच तोऱ्यात, मिशा गोंजारीत बसले आहेत. गावातली प्रतिष्ठित मंडळी, सदोबा कुलकर्णी हेडमास्तर, सौ. हसबनीस, ही वसली अहेत. मामलेदार साहेबांचे अध्यक्षीय भाषण संपत आले आहे. ]

**मामलेदारसाहेब** :– आज हा किती सुंदर योगायोग पहा. भारताचा आत्मा आपल्याला खेड्यात दिसेल, पहायला सहानुभूतीने भरलेले डोळे हवेत; असे काणेगुरूजी म्हणत ते मला यावेळी आठवलं. (गुरुजींची आठवण येऊन मामलेदार गहिवरतात.) गुरुजी म्हणजे मूर्तिमंत भावनात्मक एकात्मता, सहानुभूती, वात्सल्य, प्रेम (गहिवर अनावर होऊन मामलेदार डोळे पुसायला लागतात. हेडमास्तर, सौ. हसबनीस सारी मंडळी डोळे पुसायला लागतात.)

**सरपंच**:– (सर्वांकडे विजयी मुद्रेने पहात) मंडळी, येवडं काई मणाला लावूण घेऊ णका. काने गुरुजी गेलं. तरी त्येंचा आत्मा कां काय म्हनत्यात त्यो अजून हाय बर कां, खेड्यातणी हिंडतुया या आमच्या मास्तरांच्या रुपाणं, काय सदोबा ऽ का झ्वाप लागली. (सदोबा कुलकर्णी खडबडतात) आता ह्यास्नी झोपा अशा लागल्यावर त्या काय करनार बिचारा ऽऽ साहीब हुंद्या सुरु ऽ एवडं मनाला लावूण घेऊ णका.

(मामलेदार भाषणात व्यत्यय आणल्याबद्दल चिडतात खरे ! पण करणार काय ? भाषण पुढे सुरू करतात.).

**मामलेदार**:–आज अपारगावचा स्वातंत्र्यदिन, माझ्या अध्यक्षतेखाली साजरा व्हावा हा माझ्या आयुष्यातील स्मरणीय क्षण आहे. मला बोलाविल्याबद्दल माननीय सरपंच, सेक्रेटरी व सर्व ग्रामस्थांचा मी आभारी आहे. (मामलेदार बसता बसता लांबवर हार घेऊन उभ्या असलेल्या पंचायतीच्या शिपायाला 'हार घाला' अशा खुणा करीत असतात. तो सरपंचाकडे बोट दाखवीत असतो. सेक्रेटरी सरपंचाना भाषणासाठी खुणवीत असतात. शेवटी सावकाश सरपंच आभारप्रदर्शनासाठी उभे राहतात.)

**सरपंच** :– माझ्या प्रेय बंदु आनि भगिणीणो, 'आबार मानणे' ह्ये आपुन लई वर्स करीत आलो. आता अक्षि कंटाळा आल्याला हाय. अवो पर करनार काय? आँ ! देसकार्य म्हंजी ह्ये सगळं कराव लागतं हो. आता ह्ये साहीबच बगा ! न बोलवता आपलं अद्यक्ष म्हनून लाभला.यौगायौग म्हनत्यात त्यो असा.(मामलेदार रागारागाने पहात रहातात.) आनी म्हनलं, इनृस बाबा ! येनारच म्हनल्यावर अडिवनार कोन? त्यातून मानूस अदिकारी ! आमाला फुकटात अद्यक्ष त्येंरूी फुकटात कोंबडी आनि वर ह्यो (दारूची हातानी खूण करतो) (मामलेदारांचा संताप अनावर होतो आणि ते पेपरवेट टेबलावर आपटतात.) न्हाई साहीब रागवू नगा, पर आपुन खोटं बोलनारी मानसं न्हवं वर का ! तवा मंडळी त्येंच्या अंगात ज्यो काय उत्साव हाय म्हनत्यात, अवो 'उत्साव (सेक्रेटरी या शब्दाचे 'उत्साह' असे स्पष्टीकरण पुढे येऊन देतात.) त्याबद्दलं पयलं अद्यक्षाचं अबार. दुसऱ्यांदाव अबार आमच्या हसबणीस मास्तरच्या बायकुचं, आता गानं येत नसूणबी बिचारी 'जणगनमण' म्हननार हाय. म्हनल म्हननास. (इतक्यात कांही 'सपाट' डोक्याची माणसे उभी राहातात.) (त्याना उद्देशून,) अवो बसाऽ बसाऽ आयला ऽ अजून 'जणगनमण' झाल्यालं न्हाई. बसा बसा. तवा सांगायचा मुद्दा असा कि ह्यो २६ जाणेवारी तुमाला दिवसबी दिसला णसता, अवो गांधी काय, णेहरु काय ? यसवंतराव काय ? आमी काय रक्ताचं पानी केलया तवा ह्यो मिळालय. (स्वत:कडे बोट दाखवतो) त्येचात काय फुशारकी न्हाय म्हना ! सर्वे देशभक्ताणा ह्ये असंच कराय लागतं. तवा आज प्रतिदण्या करा कि देशासाठी येक थेंब तरी रक्तदाण करीण (मंडळी सरपंच म्हाराज कि जय च्या आरोळ्या ठोकतात) आयला मंडळी ! माज्या नावाणं वरडाय काय मी मोटा मानूस न्हवं बर कां! उगच कां वरडताय ? आँ ! काय साहीब ? (इतक्यात सेक्रेटरी घाईघाईने एक सूचनेचा कागद सरपंचाच्या पुढे धरतात. सरपंच रागावतात.) आयला आमास्नी वाचाय येतय व्हय. द्यावा तुमीच वाचूण.

**सेक्रेटरी**:– (माइकजवळ येऊन) आज २६ जानेवारी निमित्त आपल्या गावातले म्हादबा न्हावी १०० दाढ्या फुकट करणार आहेत. देशभक्ताणी स्टेजच्या मागे णावे नोंदवावीत.(मंडळी म्हादबा न्हावी कि जय अशा आरोळ्या ठोकतात.)

**सरपंच** :– पायलं का मंडळी ! ही सर्वी भाव मारन्याची लक्षनं. सकळी या म्हाद्याला येक दाडी फुकट हुइना आनीऽ आताऽ (सेक्रेटरी 'पुढं सुरु' अशी खूण करतात.) तवा म्हाद्याचंबी आज अबार मानाय पायज्यात. तवा मंडळी अशी आपुन ब्यायी झिजवूण त्याग करा. तवा मोठेपना लाभतो. चने खावे लोखंडाचे। त्यंव्हा ब्रह्मपदी णाचे । असं तुकोवाणी म्हनल्यालं हाय त्ये काय उगच. ( एवढ्यात सरपंचानी

**यंदाची संक्रांत–**




..... आणि उपवाहन 'उंट' आहे










ठवलेली बया, पारू त्या सभेत प्रवेश करते. एकच गल्ला उठतो.)

**पारू** :– अर मुडद्याणो, लोकाला कशाला रंऽऽ
द्याण शिकवताया ऽ आमचं पैसं रं ऽ ऽ

**सरपंच** :– आयला पारे, गप्प बस मी केवडा मोठा मानूस ! गप्प बस ! तवा मंडळीणो मानसाण देसकार्य करीत असताणा येणाऱ्या संकटाकडं लक्ष द्याचं नसतं. अवो देसकार्यात ह्याऽ-ह्याऽ पारीसारखी लई इघ्न येतात पर मानसान भ्याचं असतं कां? अर मर्दाणो 'णाही' म्हना. त्या सकटांशी कुस्ती करायची असते (होय म्हणून मंडळी ओरडतात ) वा रऽ माज्या वागानु ! काय तरी 'पावर' हाय.

**पारू** :– (चिडून) त्येस्नी कशाला शिकवताय रऽऽ मेल्याणोऽ आपल्या पायांत काय जळतया ऽ अग बयाऽ गऽ मुडदा बशिवला देसकार्याचाऽ

**सरपंच**:– पारेऽऽ गप्प बस मानसान किती म्हाजूरीपना करावं गऽ मी एवडा फुडाटी मानूस.

(इतक्यात मामलदार ओरडतात "काय चाललय ह्ये सोंग का सभा ?")

**सरपंच**:– राग माणु नका पर सवा म्हंजी आपुन सगळ्याणी काडल्यालं सोंगच की साहेब, ह्ये आपलं 'प्रायवेट बुक' हाय बरंका तुमच्या त्या 'आवक जावका' पैकी न्हवं पारे ऽऽ गप्प बस बगू, न्हाई तर दीन येक तोंडात ऽ (इतक्यात पारी बेशुद्ध पडते सभा पांगते)

**सरपंच**:– अरं ये पळताय कां ! तिचा सुवास चालतुया कि न्हाई? बगा बरंऽ (आणि एवढ्यात सरपंच मागे पहातात तो अध्यक्षासकट माणसे उठून गेलेली. सेक्रेटरी व महाद्या न्हावी उभे आहेत )

**सरपंच** :– आ ! काय मानसं बगा ! मंडळी शेवा म्हनून काय न्हाईच ! काय म्हनायच रं तुमास्नी (विंगेत पहात) 'जणगनमण' व्हाच्या आदीच पळताय, प्रेक्षकांकडे पहात मंडळी, तुमी जायाचं न्हाई, बरं कां! कसं झालं तरी देसकार्य हाय ह्ये. अवो मास्तरीनबाई म्हना !! आॅ ! आता त्या कुटं गेल्या ?

**सेक्रेटरी** :– (खाली मान घालून) असल्या प्रसंगात त्या न्हाल्यात व्हय. कवाच घरला गेल्या आनीऽ

**सरपंच** :– मग तुमी का न्हायलाय ऽ हाना गाडी ! (सेक्रेटरी व महादू जातात. पारु किलकिल्या डोळ्यान पहाते) पारे ! अग ! ये पारु! उट ग माझ्या सोने ऽ किती हट्ट करावा मानसान आऽ पैसं काय 'घरपट्टी' वसूल झाली कि देतो.

**पारू** :– (उठून बसत) मग काल राती म्हाई आला. मला वाटलं दुसरी कुनीऽ

**सरपंच** :– आता, देशभक्तास्णी कामं कां थोडी का काय ? काल अथि महत्वाच्या कामांत हुतो मामलेदारासंगं. उट ! उट ! (तिच्या हाताला धरून उठवतो) मंडळी, हसता कशा पायी, अवो इष्णूला लक्ष्मी, संकराला पार्वती तशी फुढाऱ्याला बी कुनितरी लागतच कि. अवो त्या शिवाय 'त्या लस्करच्या भाकरी फोकाटमंदी भाजायच्या कुनी' आॅ !

बरं ! लई हसला ! दमला असाल आता जावा घरला ! आमीबी जातोय ! थांबा थांबा ! जयहिंद म्हना ! अवो आज हाय सव्वीस जाणेवारी.

अक्षि परजासत्ताक दीणच !

• • •

(पृष्ठ १५ वरून–कथा एका परीची)

–'डॉक्टर या क्षणापर्यंत तुम्हीही मला हवे होतात. पण माझे वडील म्हणून. कुणी तुमच्याबद्दल काहीही सांगितलं, तरी मी त्यावर विश्वास ठेवला नाही. तुमच्या डोळ्यात मी एक प्रेमळ पित्याची मूर्ती पहात आले. नका. डॉक्टर तुम्हाला तुमच्या साईबाबाची शपथ आहे. माझ्या मनातल्या मूर्तीचा असा चक्काचूर करू नका. मागं व्हा... मागं व्हा...' पण अरुणेच्या तोंडून एक अक्षरही बाहेर पडत नव्हतं. भीतीनं तिची वाचाच बंद झाली होती. तिचं मौन ही संमती समजून तिला भिडण्याचा प्रयत्न करीत, डॉक्टर म्हणत होते,

'फार वाट पाहिली अरुणा मी... पण कुणाकडून संमतीची इशारत मिळाल्याशिवाय आपण कधी घाई करीत नाही. हो कुणाच्या इच्छे-विरुद्ध आपण कुणाच्या अंगाला हात लावत नाही. तू आपल्याकडं फुलं घेऊन आलीस. आम्ही मतलब समजलो. अरुणा खूष आहोत आपण खूष. . . '

आणि बोलता बोलता डॉक्टरनी खोलीतील दिवा बंद करून निळा दिवा लावला. निळा अंधार. मग मात्र इतके वेळ गोठून गेलेली अरुणा चवताळून उठली. सगळी ताकत एकवटून तिनं तर्रर झालेल्या साऱ्यांना मागं ढकलून दिलं. आणि खोलीबाहेर पडली. कॉरिडॉवरून पळत सुटली. किलकिला असलेला हॉस्पिटलचा मुख्य दरवाजा धाडकन् उघडला. पायऱ्यावरून एकदन बागेतल्या वाळूवर उडी घेतली. मधला वाळूचा रस्ता दोन तीन टांगातच तिनं ओलांडला. बागेचं फाटक बंद करून त्याला आतून कुलूप लावण्यात आलं होतं. तशी ती फाटकावर चढून उभी राहिली. तिनं रस्त्यावर उडी टाकली आणि जी पळत सुटली ती घर येईपर्यन्त थांबली नाही. रागिणीनं दार काढलं, तशी झटकन् घरात शिरून तिनं गच्च दार लावून घेतलं आणि क्षणभर बंद केलेल्या दाराला पाठ टेकून उभी राहिली. मग थोड्या वेळानं अंथरुणात शिरली. तरीही त्या सुगंधी उद्यानातील तो डिवचला गेलेला साप अजून आपला पाठलाग करीत आहे असं वाटत होतं. काळीज अजून धाड् धाड् करीत होतं. भोवतालच्या शान्ततेत तिला आपल्या काळजाची धडपड स्पष्टपणे ऐकू येत होती. स्वयंपाकघराच्या दाराला पोखरणारा वाळवीचा किडा कर्रर कर्रर आवाज करीत होता. बाहेरच्या खोलीत आण्णा शांतपणे घोरत होते. अजून अरुणेची भीती कमी होत नव्हती – आई असती तर तिच्या कुशीत शिरलो असतो. तिनं मग मायेनं पाठीवरून हात फिरविला असता. आता मी कुणाच्या कुशीत शिरू ? आण्णांच्या ?... छे: वडील असले तरी आण्णा एक पुरुष आहेत. पुरुष. पशुकोटीतील पुरुष. आणि आण्णांचा घोरण्याचा आवाज अचानक थांबला. मघाशी डॉक्टर पुढ्यात उभे असताना भेदरली नव्हती इतकी आता अरुणा घाबरली– आण्णांचं घोरणं थांबलं कां ?

आण्णा—

आई असेपर्यंत एकही रात्र तिला विश्रांती घेऊ न देणारा पशु– आई गेल्याला सात आठ महिने झाले. भुकेला, वखवखलेला हा पशूच आपल्या येण्याच्या आवाजानं जागा झाला असेल काय ? उठून तो आपल्याकडंच यायला निघाला असेल काय ? शक्य आहे. या जगात काहीही शक्य आहे. साईनाथाच्या मूर्तीसमोर दरवळणाऱ्या उदबत्तीच्या धुराचे विषारी साप झाले. अन्तःकरणापासून ज्यांना [illegible] मानलं ते डॉक्टर....आण्णा तर जन्मभर पशूसारखेच जगले...

अरुणेच्या सर्वांगाला घाम फुटला. सगळं अवसान गोळा करून ती अंथरूणातून उठली. मधलं दालन ओलांडून आण्णा आत यायच्या आत ती फिरून घराबाहेर पडली. अंधाराच्या दिशेनं, अंधाराच्या वाटेनं अंधारात. अंधारात. . .

एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळताना आण्णांचं घोरणं क्षणभर थांबलं होतं. कूस बदलताच ते परत सुरू झालं होतं. आण्णा शान्तपणे घोरत होते.

★ ★ ★

# आवर्त

—मनोहर तल्हार

**आजारातून उठलेली शर्मू पेरूळला गेली खरी, पण परतताना घरी जाण्याऐवजी पुन्हा दवाखान्यातच येऊन दाखल झाली !**

---



**ती** 'सिरिअस' असल्याची तार हाती पडताच तो तिच्यासाठी घडपडत आला होता. त्यानं स्वत: तिच्यासाठी सर्व खस्ता खाल्ल्यात. रात्र रात्र तो जागला. तिला बरं वाटायला लागलं. काळजी करण्यासारखं आता नाही हे पटलं तेव्हाच तो परतला होता.

तीन आठवड्यानंतर तो पुन्हा येतो.

तो येणार असल्याची तार मिळताच तिला अस्मान ठेंगणे होते. काय करू न् काय नको असं तिला होतं. एखाद्या बालिकेसारखं तिचं मन चंचल होतं. ती सारखं-सारखं काही काही बडबडू लागते. त्याला ती सतत काही ना काही सांगू लागते. ती त्याच्यावर रागावते–रूसते–फुगते आणि लगेच हंसतेही.

तिच्यातला हा उत्साह. तिची ही प्रफुल्लीत मुद्रा तो एकटक न्याहाळतो. गालातल्या गालात हसतो.

ती कुठे तरी शून्यात बघत असते. स्वत:शीच पुटपुटावी तशी ती म्हणते —

"खरेच मी मोठी भाग्यवान आहे. मला तू मिळालास, तुझं प्रेम मिळाले ! आय अॅम व्हेरी हॅपी राजेश !" तिला इतका आनंद होतो की तो कसा व्यक्त करावा हे तिला कळत नाही. तिचा स्वर जडावतो आणि तिच्या डोळ्यात आसू गोळा होतात.

"मी तुझा आनंद समजू शकतो !" तो तिला जवळ घेतो. तिच्या डोकीवरून प्रेमानं हात फिरवतो.

आपणावरील तिच्या प्रेमामुळे तोदेखील भारावून जातो. तो जास्त काही बोलत नाही. नुसता तिच्याकडे बघतो. एकटक.

ती अतिशय कृश झालेली असते. एखाद्या चवदा पंधरा वर्षे वयाच्या किडकिडीत मुलीसारखी ती दिसू लागते. तिच्यापेक्षा टिल्ली अधिक भरलेली असते. पंधरा वर्षे वयाच्या मानाने अधिक स्थूल असते. वयानं ती टिल्लीपेक्षा दुप्पट मोठी असूनही तिची देहयष्टी टिल्लीपेक्षाही किडकिडीत असते. आणि या आजाराने तर तिचे गाल खोल जातात. डोळ्याभोवती काळी वर्तुळे दिसू लागतात. हातापायाची हाडे बटबटीतपणे वर डोकावतात आणि गळ्याची हाडे उघडी पडतात. उरोज आणि नितंबाचा पुष्टपणा जराही जाणवत नाही.

तो तसा एकटक आपणाकडे बघतो असल्याचे तिला जाणवते. तिला थोडे अवघडल्यासारखे वाटते. मनाचा हिय्या करून ती म्हणते——

"राजेश, खरे म्हणजे मी तुला आता शोभतही नाही."

"शर्मिला, उगीच डोक्यात भलते-सलते विचार आणू नकोस. त्यामुळे——"

"काय बघत होतास एवढा टक लावून ?"

"तुझे सौंदर्य !"

ती हसते. म्हणते——

"किती उपरोधिक बोलतोस रे तू ?"

"तुला सारे उपरोधिकच वाटते शर्मू ! गेल्या तीन आठवड्यापूर्वी तू कशी होतीस ? तुला नाही कळणार—अतिशय कृश झाली होतीस तू ! आता तीन आठवड्यात बघ तुझ्यात कमालीचा बदल झालाय्. पूर्वीपेक्षा आता गाल वर आलेले आहेत. अंगानं तू अधिक भरलेली वाटतेस ! पूर्वीच्या मानाने तुझी वर आलेली हाडे बुजत असल्याचे जाणवत आहे. आणि मुख्यत: तुझी वृत्ती अतिशय प्रफुल्लित दिसते आहे. त्यामुळे तुझ्या व्यक्तिमत्वाला एक तजेला आला आहे. गोंडसपणा आला आहे !"

त्याच्या बोलण्याने ती सुखावून जाते. संपूर्ण अंगावरून मोरपीस हलके हलके स्पर्शून जात आहे असा तिला भास होतो आणि त्यामुळेच की काय तिला कुणी तरी गुदगुल्या केल्यासारखे वाटू लागते.

"काल तुझी तार आली तेव्हापासून मी अशी हलकी—फुलकी झाले राजेश ! मन 'म्हातारी'सारखं वजनरहीत झालं. राजेश, आता या शरीराला-मनाला बंधने नको आहेत. त्यांना आता पूर्ण मोकळीक हवी आहे. इथल्या बंदिखान्यात मला कुणी तरी डांबून टाकले आहे असे सतत वाटत होते. मी मनातल्या मनात झुरत होते—कुढत होते. माझं कल्पनाविश्व जागं होत होतं. दिवसा जागेपणी मला स्वप्न पडत होती. सुकुमार राजकन्येला कुणीतरी बंदिस्त केलं. तिची कळी निर्माल्यवत् झाली. आणि मग एकेदिवशी एक धडधाकट शरीरयष्टीचा राजपूत्र सर्व संकटांना भिरकावून तोंड देऊन तिच्या जवळ आला. तिला अलगदशी उचलून घेऊन गेला. तिला वाटेल तिथे ! अगदी हवेत उडून अंतराळात सुद्धा. आणि ती राजकन्या उमललेल्या टवटवीत फुलासारखी झाली. दंवबिंदूने डंवरलेल्या फुलाइतकी ताजी ! "

तेवढ्या बोलण्याचीही तिला धाप लागते. तो धपापलेल्या तिच्याकडे बघतो. तिचा चेहरा घामाने डबडबून गेलेला असतो. तो उठतो. आपल्या रुमालाने तिचे कपाळ टिपतो. गळ्याखालचा घाम टिपून काढतो. हलक्या हाताने.

तो हे करीत असता ती अतिशय सुखावून जाते. त्याचे दोन्ही हात आपल्या हातात घेते. त्यावर आपले कपाळ टेकविते. भावनावेगानं त्या हाताचे चुंबन घेते.

''तो राजपूत्र मला लाभला आहे. मला आता कसलीही भीति नाही. माझं मन म्हणून 'म्हातारी'सारखं वजनरहीत झालेलं आहे. वाटतं-तुझ्या खांद्यावरून अंतराळात फिरावं आणि हे जग वरून बघावं. अगदी नव्यानं—नव्या दृष्टीनं."

'तथास्तू !' तो मिस्कीलपणे हसून म्हणतो. बाहेरून गाडीचा 'हॉर्न' ऐकू येतो. तसा तो म्हणतो——

"चला ! गाडी तयार आहे !"

दवाखान्यातून आपले सामान यापूर्वीच तिने नोकराकरवी पाठवून दिलेले असते. फक्त छोटी पर्स आणि एक प्लॅस्टिकची बादली असते. त्यात ती कंगवा, छोटा आरसा आणि नॅपकिन व्यवस्थित ठेवते. बादली हाती घेते. साऱ्या खोलीभर नजर फिरविते. स्वत:शीच पुटपुटावी तशी म्हणते –

''गेल्या दीड महिन्यात या खोलीशी-या बेडशी एक नाते जुळल. आता सोडून जाताना मनाला थोडं वाईटही वाटतं."

''ती प्लॅस्टिकची बादली मजजवळ दे !

''वजन नाही फारसं !"

'तरी पण दे' !

तो तिच्याजवळून ती बादली घेतो. तिच्या दंडाला धरून चालू लागतो. तशी ती म्हणते ——

''इतकी अशक्त नाही मी, राजेश ! आता आधाराशिवाय मी चालू शकते !

''बघ, नाहीतर चक्कर येईल !"

''मी खोलीतल्या खोलीत येरझारा घालून 'प्रॅक्टीस' केलीय् चालण्याची. आता तर मी पळू शकेन इतके बळ माझ्यात आहे!"

''म्हणूनच धरून ठेवले तुला ! पळून गेलीस तर डॅडी मला जाब विचारतील!"

त्याच्या कोटीवर ती मनमोकळी हसते. म्हणते –

''पळून जाईन ती तुझ्याच बरोबर ! डॅडी कुणाला जाब विचारतील ?"

''चल लवकर. पळून जाण्यासाठी गाडी तयार आहे !"

ती दोघेही दवाखान्याबाहेर पडतात. ड्रायव्हर तिला बघून चेहरा हंसरा करतो. सलाम ठोकतो. ती नमस्कार करते. हंसतमुखाने. ती प्रथमच मोकळ्या वातावरणात आलेली असते. तब्बल दीड महिन्यानंतर. दवाखान्याच्या परिसरातील प्रत्येक दृश्य ती न्याहाळते. नव्या नवलाईनं.

तो गाडीचं फाटक उघडतो. म्हणतो–

"बैस !"

ती टुणकन् उडी मारल्यागत बसते. दार ओढून घेते. घट्ट बसविते. तो 'व्हील-' पाशी बसतो. दार ओढून घट्ट बसवितो. ड्रायव्हरला जवळ बोलावून सांगतो——

''तू बंगल्यावर जा. 'बस'ने. डॅडींना सांग की आम्ही थोड्या वेळानं येतो म्हणून !"

''जी !" आणि ड्रायव्हर जातो.

तो कोटातून सिगारेटकेस काढतो. तिच्याकडे बघून तिला विचारतो——

"सिगारेट ओढण्याचा तुला त्रास होईल काय ?"

ती गालातल्या गालात हंसते. मग मिस्कीलपणे म्हणते –

''Sorry! मी कधीच ओढीत नसते !








मंदसूरात रेडिओग्रामवर 'कम सप्टेंबर'ची धून वाजत असते. तिला ते मंद स्वर खूपच आल्हादकारक वाटतात. ती एकदम आनंदीत होते. उत्साहीत होऊन म्हणते —

"ही एकच रेकॉर्ड अनेकदा ऐकून दरवेळी मला ऐकावीशी वाटते !"

ती दोघेही निवांत जागी बसतात.

गोंगाट नसतो. गडबडघाई नसते. सारे कसे शांत !

निमूटपणे एक वेटर येतो. अदबीनं उभा राहतो.

"दो कॉफी स्ट्रांग !" तो सांगतो.

तो निघून जातो.

ती घड्याळात बघते. तीन पंचवीस ! अजून भरपूर दिवस असतो. आणि तिच्या डोक्यात कल्पना येते. ती हुरळून म्हणते —

"राजेश आपण वेरूळला गेलो तर ?"

"आत्ता ?"

"हो ! फक्त अर्ध्या तासाचा रस्ता. तास दीडतास थांबू ! साडे पांचपर्यंत आपणाला परत येता येईल. कसे ?"

"As you please !" आणि नंतर तो विचार करून म्हणतो —

"पण तुला ते श्रम झेपणार नाहीत. आजारातून उठल्यानंतर एवढी झेप नको. पुढे कधी तरी जाऊ !"

"नो ऽ नो !"

"अग पण थोडं चढावं—उतरावं लागणार. बघताना सारखं उभं राहावं लागणार किनई ?"

"आधार द्यायला तू आहेस ना ! थकल्यासारख वाटलं की लगेच परतू या. चालेल ?"

"डॅडीनी 'ऑब्जेक्शन' घ्यायला नको ! तू नुकतीच आजारातून उठलीस आणि लगेच असं फिरणं त्यांना मुळीच आवडणार नाही !"

"राजेश—" ती डोळे मोठमोठे करून त्याच्याकडे बघते.

"अच्छा ! तुझी मर्जी !"

वेटर कॉफीचे दोन पेले आणतो. ठेवून निघून जातो. ती एक पेला तिच्यापुढे सरकविते. ती कपानं घुटक्या घुटक्यानं कॉफी पिते. स्वतःला हरवून गेल्यागत.

कॉफी कधी संपली हे तिचे तिलाच कळत नाही. ती मग मनाशी विचार करते: कॉफीची चव कशी होती ?

"आपण आणखी कॉफी घेऊ या !"

तो वेटरला बोलावतो. पुन्हा कॉफी आणायला सांगतो.

"राजेश, सारं वातावरण किती सुरेख आहे! तिथे मी दवाखान्यात होते. भितीवरली पाल चोरपावलाने सरकून माशी मटकावते तसा तो अंधार मला गिळीत होता. मला किनई अंधाराची खूप भीति वाटायची. चित्र विचित्र कल्पना माझ्या डोक्यात यायच्या. कुणी तरी बुक्का उघळावा आणि तो साऱ्या खोलीभर पसरावा तसे वाटत होते. बुक्क्याचा जाड थर आपल्या अंगावर साचल्यासारखं मला वाटत होतं. चटकन् उठून प्रकाशासाठी विद्युतगुंडी दाबावी असे वाटत होते. पण अंगात मुळीच शक्ति नसल्याची जाणीव व्हायची. अंगावर जाडया आणि गडद अंधाराची दुल्हई, ती बाजूला सारण्याची देखील अंगात ताकद नाही, कसे करावे, काही सूचेनासे होई आणि मग डॅडी किंवा ममी कुणी तरी विद्युतगुंडी दाबायचे. मांजराने शेपूट दाबून पळावे तसा अंधार नाहीसा होई. परंतु त्याच्या खुणा खोलीत असायच्या. वस्तू वस्तूच्या खाली—बाजूला !"

पुन्हा कॉफी येते.

ती कॉफीचा एक पेला त्याच्यापुढे सरकविते. स्वत: कपाने पिते. घोट घोट!

"कॉफी खूपच छान आहे! पुन्हा बोलावू काय?" तो विचारतो. ती दिलखुलास हंसते.

"काही दिवसानी तू कवयित्री होशील की काय याची मला भीति वाटते आहे!"

"मला फक्त अंधाराचीच भीति वाटते. कधी कधी आगीचे डोंब उसळावेत तसे अंधाराचे माझ्या नजरेसमोर डोंब उसळतात. ज्वाला वेगळ्या दिसाव्यात तशा काळ्या ज्वाला दिसू लागतात. पण चटके बसत नाहीत. अजस्र प्राण्याच्या लांब लांब जिव्हा लवलवतात तशा. त्या लवलवत्या जिभांचा स्पर्श होताच कधी कधी संपूर्ण शरीर थंडगार व्हायचे. कधी कधी त्या जिभा गुदगुल्या करायच्या. मला त्यामुळे सारखे हसायला यायचे. डॅडी मात्र खूप संतापत. वेड्यासारखी हंसते आहे म्हणून रागावत. त्यांच्या रागावण्यावर मी रडले तर ते मला चोपकारत. गोंजारत. त्यांच्या गोंजारण्याने संपूर्ण शरीरभर प्रकाशाचा प्रवाह विजेसारखा सुरू व्हायचा आणि शरीरातली ती थंडगार लाट नाहीशी व्हायची!"

तो ते सारं काळजीपूर्वक ऐकतो. अस्वस्थ होतो. म्हणतो—

"भयंकर! महाभयंकर!"

"काय?" ती हंसून विचारत.

"तुझ्या ह्या कल्पना!"

"कल्पना नाहीत. हे सारं मी तिथल्या खोलीत अनुभवलं आहे!"

वेटर बशीत बिल आणून ठेवतो. तो पाकिटातून एक नोट काढून तीत टाकतो आणि उठतो.

"चला!"

तीही उठते. पर्स हाती घेऊन चालू लागते. सावकाशीने. ती दोघेही गाडीत बसतात. आणि तो गाडी हळूहळू चालवू लागतो.

गाडी शहरातून बाहेर वेरूळच्या रस्त्यावर आल्यावर तो ती भरदार पळवितो.

दोन्ही खिडक्यातून हवीहवीशी वाटणारी थंडगार हवा आत येते. वेगाने आणि तिच्या डोकीवरला पदर फडफडू

तो लाडं लाडं तिच्या टपलीत लगावतो. हलक्या हातानं. भग म्हणतो—

''मोठी खटचाळ आहेस तू ! मी सिगारेट ओढण्याचा तुला त्रास होईल काय ?''

''मला स्वतःला जरी तू जवळ ओढलेस तरी आता मला त्रास होणार नाही !'' ती त्याच्याकडे मिस्कीलपणे बघते. हंसते.

''मला मात्र होईल! ''

''तो कसा ?''

''हा असा !''

तो तिच्या खांद्यावरून डावा हात टाकतो. तिच्या डाव्या खांद्याला हाताने धरून तिला स्वतःच्या छातीशी घट्ट धरतो. तेवढ्यानंही तिला गुदमरल्यासारखं होतं. ती दीर्घ श्वास घेते हलके हलके सोडते. म्हणते —

''सोड बघू मला ! रस्त्यावरले सारे लोक बघताहेत !

''बघू दे ! त्याना दुसरी कामे नाहीत, ते तरी काय करतील ?'' ती धडपडून स्वतःला सोडवून घेते.

''दमलीस ना ? अजून पुष्कळ पळायचे आहे आपल्याला !''

''खरे आहे ! पहिल्यांदा गाडी सुरू करा ? ''

तो सिगारेट केसमधून एक सिगारेट काढतो. ओठात अलगदशी ठेवून पेटवतो. वाकडा तिकडा धूर सोडून गाडी चालू करतो.

''किती मोकळं मोकळं वाटतं आहे. ही स्वच्छ निर्मळ हवा किती आल्हाद-कारक वाटते आहे ? त्या दवाखान्यातल्या खोलीचा एक विशिष्ट उग्र–औषधी-मिश्रित दर्प सतत माझ्या नाकात भरून होता. आज दीड महिन्यानंतर माझी मुक्तता झाली, बंदिवासातून मोकळी झाले. वाटतं–खूप दूर जावं. एखाद्या उंच टेकडावर आणि खूप श्वास भरभरून निर्मळ हवा आत घ्यावी आणि सर्व शरीरातून तिला खेळू द्यावी.''

''कुठे चलायचं ?'' तो सिगारेटचा लांबलचक झुरका मारून विचारतो. आडवा तिडवा पसरलेला धूर तिच्या नाकातोंडात जातो आणि तिला ठसका येतो. ती खोकू लागते. खोकता खोकता ती गदगदून हलू लागते. तसा तो गाडीचा वेग एकदम कमी करतो. तिला आपल्या वाहूने सावरतो. तिच्याकडे बघतो. खोकून खोकून तिच्या डोळ्यात पाणी येते. तो चटकन् रुमाल काढतो. तिला देतो. ती चटकन् प्लॅस्टिकच्या बादलीतून नॅपकीन् काढते, डोळे पुसते. रागारागानं म्हणते –

''आता तू ही पवित्र हवा थांबव पाहू !''

तो सिगारेट फेकून देतो. तिच्याकडे पाहून हंसतो. विचारतो—

'कुठे चलायचं ?'

'आपण कुठेतरी प्रथम कॉफी घेऊ या!'

''एखाद्या चांगल्या हॉटेलात. जिथं मोकळेपणानं बसता येईल ! बोलता बोलता कॉफीची मजा घेता यईल !''

तो पुढील वळणावरून गाडी वळवितो. थोड्या वेळातच तो 'अशोका' पाशी गाडी 'पार्क' करतो. स्वतः उतरतो व तिच्याकडील दार उघडून तिला हात देतो. ती त्याचा हातात हात घेवून सावकाशीनं उतरते. ती उतरल्यावर दार बंद करतो. आणि दोघेही हॉटेलात शिरतात.

लागतो. ती सावरण्याचा प्रयत्न करते. आणि तो वारंवार झेंडा फडफडावा तसा फडफडू लागतो. तिला त्या वाऱ्याशी खूप खेळ खेळावासा वाटतो. तितक्याच खेळकरपणे. तिचाही उत्साह कमी नसतो. ती अतिशय उल्हसित होते. म्हणते—

"राजेश, आणखी वेग वाढव! किती मजेदार हवा आहे ही? अगदी ताजी. बगिच्यात उमललेल्या सकाळच्या फुलांसारखी! ह्या हवेचा दर्प किती सुखकारक आहे, नाही? अशी ताजी हवा मिळती तर माझा आजार एव्हांना दूर पळता. ही सारी हवा प्यावीशी वाटते. खूप तहान लागल्यासारखं मनाला झालं आहे! आता मी खरेच तृप्त होत आहे! असीम तृप्ती मला लाभत आहे!"

तो तिच्याकडे बघतो.

तिचा चेहरा खूपच टवटवीत दिसू लागतो. चेहऱ्यावर असीम समाधान आणि नजरेत एक नवे तेज झळकू लागते. पूर्वी कधी बघितले नव्हते असे!

चार वाजून दहा मिनिटानी त वेरूळला पोचतात.

ती गाडी थांबवून तिला उतरवितो. ती सारं नव्यानं बघते. प्रत्यक दृष्य मन लावून बघते. बघता बघता मनातून खूप हरखून जाते.

"अहाहा! किती सुंदर! किती सुंदर!!"

तिचे वेगळेच रूप तो न्याहाळतो.

"राजेश, किती भव्य आणि उदात्त वाटतं इथं? किती–किती? वंडरफूल!"

ती हरवल्यागत बघते. अनिमिष नेत्रांनी!

तिला असे हरवल्यागत बघून तो मनातल्या मनात सुखावून जातो. दूरवर उभा राहून तो मजेशीर सिगारेट ओढू लागतो.

ती त्याच्याजवळ येते. तो सिगारेट खाली टाकून बूटाने रगडतो.

"'केव्ह' बघू या–" ती म्हणते.

"चल, पण चालण्याचा–चढण्याचा जिथं त्रास होईल तिथं बंद! तिथं पुन्हा कधी तरी जाऊ! ना?"

त्यावर ती नुसती गालातल्या गालात हंसते.

आणि एकेक 'केव्ह' नव्यानं बघताना ती त्या अप्रतिम वास्तुशिल्पान भारावून जाते. शिल्पातल लावण्य–सौंदर्य बघून ती दिङमूढ होते.

"किती अवाढव्य हे काम राजश? किती पावसाळे गेलेत! किती पुरातन! काही ठिकाणी क्वचित् मोडतोड झालेली! अगदी सुरुवातीला हे किती टवटवीत आणि तकाकीचे असेल? ही बुद्धाची भव्य मूर्ति! केवढी उदात वाटत? अहाहा! आणि चेहऱ्यावर केवढी शांति? मन कसं भारावून जातं!"

सारख्या असणाऱ्या काही 'केव्हज्' वगळून तीन सोप्याच्या भव्य वास्तुशिल्पाकडे येतात.

"राजेश, केवढी भव्य ही वस्तू? आणि सलग एकाच दगडात कोरलेली! तीन मजले! वरून खाली कोरलेले! आधी कळस मग पाया! हा प्रशस्तपणा! आणि अगदी सूक्ष्म कोरीव काम! किती अनामिक कलावंतानी स्वतःला कलेसाठी राबवलं! स्वखुशीनं आणि देहभान विसरून! अहाहा! वंडरफूल!"

"खरे कलावंत त! आणि शमू हे स्थापत्यशास्त्र–शिल्पशास्त्र–गणित शास्त्र तव्हा किती पुढे गेलेले होते, बघ! साऱ्या शास्त्रांचा इथं संगम झालेला आहे! हे सारं शिल्प साकार करताना केवढा तोल सांभाळावा लागला असेल?"

"वंडरफूल! वंडरफूल! मानवी शक्तीच्या पलिकडलं वाटतं. म्हणून वाटतं ती माणसं दैवी शक्तीचीच!" धीरे धीरे ती दोघे सोळाव्या 'केव्ह'पाशी येतात. तो तिला दंडाला धरून हळूहळू चालू लागतो.

"हे शिल्प बघ. पाण्यातली हलती कमळे!"

"खरीखुरी हलताहेत असं वाटतं बघ राजेश!"

"आणि हा अवाढव्य गजराज! शमू, हा मधला सर्व परिसर पहाडातून कोरलेला! ही पहाडातली चिरेदार भिंत! किती 'प्लेन' आहे? भल्यामोठ्या करवतीने ह्या भल्यामोठ्या शिलाखंडांतून कापून काढल्यासारखी वाटत!"

"आणि राजेश, ह्या एवढ्या मोठ्या वजनाचा हा कापून काढलेला भाग पेलणारे हे खांब! त्यातलेच कोरलेले! केवढा हा तोल? हे गणित? किती सुंदर! अहाहा!" हलके हलके ती एकेक शिल्प बघते. बेभानपणे!

"ही सोळावी 'केव्ह' महत्त्वाची आहे! संपूर्ण महाभारत शिल्पातून साकार केलेला आहे. ही सूक्ष्मता, हा कांटेकोरपणा, रेखीवपणा! सूक्ष्म, रेखीव आणि तरीही नेटकं असं स्वयंपूर्ण! वंडरफूल!" राजेश त सारं उत्स्फूर्तपणे बोलतो. देहभान विसरून बघतो. बघता बघता ती म्हणते—

"इतिहासातले – पुराणातले अनेक नाटयपूर्ण प्रसंग इथे शिल्पातून अमर झालेले आहेत. नटराजाच्या निरनिराळ्या मुद्रा, विविध भावनांचे हे मनोहारी दर्शन. ही त्रिशूळाची फेक बघ! नटराजाच्या मुद्रेवरले हे भाव! आणि ही एकडली अर्धनारी नटराजाची मूर्ति बघ!"

तिच्या सोबत तो ती न्याहाळू लागतो.

"अगदी मधोमध प्रत्येक अवयवातून स्त्री आणि पुरुषाचा भेद किती स्वाभाविक आणि तरीही एकजीव वाटतो! सलगततून विलगीकरण! हा पुरुषाचा दणकट पाय–हा स्त्रीचा नाजूक पाय. ही पायाची ठेवण किती स्त्रीसुलभ. स्त्रीच्या कमरेतला हा इथला वांक–अगदी स्वाभाविक आणि एका लाजवंतीचा!" प्रत्येक भावना सजीव! संपूर्ण शिल्प सजीव होतं आणि वाटतं बघणाराच दगड आहे–निर्जिव आहे! इथं हे शिल्प सजीव होतं. केवढं हे काव्य? राजेश, हे महाकाव्य, शिल्पातून लिहिलेलं–शिल्पातून साकार झालेलं महाकाव्य! बघणारा इथं कवि होतो. मूळात कवि नसला तरी कवि बनतो. अहाहा! हे खरं काव्य! शिल्प सजीव होतात. आपुगाशी बोलू लागतात. त्यांच्याशी हितगुज होतं, त्यांच्याशी नातं जुळतं!"






अनुक्रमणिका

आणि ती बेभानपणे सारं पहाते. निरखून न्याहाळते. स्वतःचं अस्तित्व विसरते.

धीरे धीरे अंधार पसरू लागतो. चोर पावलानं. शिल्प बघणे कठीण व्हावे इतका अंधार साचू लागतो.

"शर्मू आता परतू या. बघताना डोळ्यांना त्रास व्हावा इतका अंधार झालेला आहे!"

"हो निघूच आता!"

आणि तरीहि ती बघतच राहते. बेभानपणे एका बेहोशीत. तो आपल्या घड्याळात बघतो. दूरवरून काटे कुठे त घडपणे दिसत नाहीत. तो घड्याळ अगदी डोळ्यापाशी आणतो. पाच पंचेचाळीस झालेले असतात.

तिचे सारे लक्ष शिल्पात असत. अगदी डोळे फाडफाडून ती बघत असते.

तो तिला विचारतो—

"किती वाजलेत शर्मू?"

ती आपल्या मनगटी घड्याळात बघते. दूरवरून काहीच कळत नाही.

"इथं खूप अंधार झालाय्. खरे म्हणजे बाहेर बराच उजेड असेल! कदाचित् सूर्य बुडालाही असेल!"

"चला परतू या आता. किती अंधार साचलाय् इथं! भीति वाटावी एकट्याला!"

तिला जबरदस्तीने घालवून दिल्यासारखी ती 'केव्ह'बाहेर पडते.

तेथील कँटीनपाशी दोघेही येतात. खुर्च्यात बसतात. तो कॉफी सांगतो. उठतो आणि तिच्यापासून थोडे दूर जाऊन सिगारेट ओढतो. भराभर झुरके मारतो.

कॉफी टेबलावर येताच तो सिगारेट विझवितो. तिच्याकडे येतो. खुर्चीवर बसून तिच्याकडे बघतो. ती कुठे तरी बघत असते. शून्यपणे. हरवल्यागत!

तो एक पेला तिच्यापुढे सरकवितो.

"शर्मू, कॉफी घे. चांगली गरम आहे!"

"अं, हो!"

ती कॉफी यांत्रिकपणे पिवू लागते.

कॉफी संपवून ती, दोघेही कँटीनबाहेर पडतात. तो तिच्या दंडाला धरून चालू लागतो.

गाडीचे दार उघडून तिला बसवितो. दार बंद करतो. व्हीलपाशी बसून तो गाडी 'स्टार्ट' करतो.

गाडी वळवून तो औरंगाबाद रस्त्याने वेगानं पळवू लागतो. खिडक्यातून येणारी गार हवा अंगाला झोंबू लागते. ती आपला पदर पाठीवरून लपेटून घेते.

बराच अंधार पडल्यामुळे तो गाडीचे समोरचे दिवे लावतो. लख्ख प्रकाश रस्त्यावरला अंधार कापीत वेगाने पळू लागतो.

गाडी बरीच दूर यते.

शर्मिला समाधीत असल्यासारखी काचेतून बघत असते. तो तिच्याकडे न्याहाळून बघतो. तिने दोन्ही हाताचा छातीवर स्वस्तिक केलेला असतो.

"शर्मू—"

"अं?"

"थंडी वाजते?"

"फार नाही!"

"कोट देऊ अंगावर?"

"अं?"

"कोट देऊ अंगावर?"

"नको!"

आणखी काही वेळ ती तशीच बघत असते. वस्ती दिसू लागते तसा तो म्हणतो–'

"शर्मू—"

"अं?"

"अवाक् झालीस्!"

"अं?"

"अवाक् झालीस तू!"

ती आवंढा गिळते. भारावल्यागत म्हणते—

"राजेश, केवढा साक्षात्कार झाला मला! शिल्प सजीव झालीत–माझ्याशी बोललीत. माझ्याशी त्यांनी हितगुज केलं! मला कृतकृत्य वाटलं. दृष्टीचं सार्थक झालं! आणि बघता बघता तिचे डोळे पाझरू लागतात. आनंदातिशयानं. तिच्या डोळ्यातून निखळ तृप्ति ठिबकू लागते. ती तशीच डोळे पाझरू देते. अगदी भारावून म्हणते–

"खरेच जन्माचं सार्थक झालंय्. आता कशाचीच भीति धाटत नाही. या अंधाराची देखील! आता मरण आलं तरी मी आनंदानं पत्करेन! फक्त सुवासिनीचं मरण यावं. मरणापूर्वी तुझ्या नांवाचं मंगळसूत्र गळ्यात असावं!"

आणि तिचे डोळे पुन्हा पाझरू लागतात. आपल्यावरील तिच्या प्रेमाने तो भारावून जातो. तिच्याविषयीच्या प्रेमानं त्याचं हृदय भरून येतं. तो तिला आपल्या बाहूत घेतो. छातीशी धरतो. आणि त्याला एकदम धक्का बसतो. तिचं संपूर्ण अंग तापलेलं असतं. तिच्या दंडाचा त्याला चटका बसतो.

तो अतिशय अस्वस्थ होतो. गाडीचा वेग कमी करतो. सिगारेट पेटवितो आणि भराभर झुरके मारतो. अतिशय अस्वस्थपणे.

आणि गाडी पुन्हा दवाखान्याकडे वळवितो. •••



मात्र काश्मिरी संक्रांतीचे वाहन 'सिंह' आहे !



गोमंतकातील संगीतशास्त्राचे एक दर्दी नि विचारवंत **श्री. मलबाराव सर्धराव सरदेसाई** यांनी महत् प्रयासाने माहिती मिळवून तयार केलेला हा खास लेख गोमंतकात भरत असलेल्या नाट्यसंमेलनाच्या निमित्ताने प्रसिद्ध करीत आहोत —संपादक

# गो म न्त का ची ना ट्य प रं प रा

**गोमन्तक** आणि नाटचाचा संबंध संगीतातल्या स्वर आणि लय यांच्यातल्या अन्योन्य संबंधासारखा आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. गोमन्तकाचे एखादे गाव सांगा की जेथे नाटक झाले नाही. आणि एखादा तरी गोमन्तकीय दाखवा की नाटक म्हणजे काय हे ज्याला ठाऊक नाही. गोमन्तकातील धार्मिक आणि देवादिकांच्या कार्याशी नाटकाचा संबंध जोडला गेलेला असल्याने 'नाटक' हा धार्मिक आन्हिकाचाच भाग बनून गेला आहे. नाटकामागला हेतु केवळ करमणूक असा कधीच मानला गेला नव्हता. तर एक पवित्र, पुण्यमय व पापविनाशक कार्य म्हणून त्या कार्याला 'धर्मकृत्य' म्हणून मान दिला गेला होता.

त्यामुळेच पुरातन काळापासून गोमन्तकात जागर, त्राटिका, वीरभद्र, पुतना, रणमालादि प्रकार, विविध प्रकारचे काले, इत्यादि नाटचप्रकार मोठ्या श्रद्धेने देवस्थानाच्या वास्तूत साजरे केले जात असतात.

ह्यासंबंधीच्या ऐकीव व ग्रंथनिबद्ध माहितीत बराच फरक पडताना दिसतो. 'परंतु ऐकीव माहिती साधार नसल्याने ती खरी आहेच असे सिद्ध करता येत नाही. पोर्तुगीज राज्यकर्त्यानी बरेचसे ग्रंथ जाळून नष्ट केल्याने ग्रांथिक पुरावाही बराचसा नष्ट झालेला असण्याची शक्यता नाकारता येत नाही.

श्री शांतादुर्गा चतुःशताब्दी महोत्सव ग्रंथ १४८८।१८८८ यात पान ३१ वर प्राध्यापक अ. का. प्रियोळकर म्हणतात, "हिंदु धर्माचे खंडण करण्याकरिता पाद्री लोकांना हिंदु धर्माचे ग्रंथ हवे होते. आपल्या सत्तेखाली असलेले सारे देशी भाषांचे ग्रंथ त्यांनी सुरुवातीलाच प्रयत्नपूर्वक जाळून टाकले. त्या जाळपोळीत सारस्वत ब्राह्मणांचे किती संस्कृत व मराठी ग्रंथ भस्मसात् झाले असतील त्यांची गणतीच नाही."

डॉ. पांडुरंगराव पिसुर्लेकर यांनीही त्याच पुस्तिकेतील लेखात म्हटले आहे: "सन १५४८ पासून गोव्यातील धर्माधिकारी हिंदूंचे धर्मग्रंथ मिळविण्यासाठी प्रयत्न करू लागले."

ह्या परिस्थितीमुळे चुकून राहिलेले ग्रंथ व ऐकीव माहिती ह्यांच्या आधारे गोमन्तकाच्या नाटचपरंपरेचा विचार करावा लागतो. या दृष्टीने डॉ. पिसुर्लेकर यांच्या पोर्तुगीज भाषेतील "Goa Pre Portuguesa atraves dos Escritores Lusitanos dos Seculos XVI e XVII या ग्रंथाचा प्रामुख्याने आधार घ्यावा लागतो. या ग्रंथाच्या पान क्रमांक ४४ वर गोमंतकीय नाटकाबद्दलचा अधिकृत उपलब्ध पुरावा आढळतो तो असा—

O Forel de Salcete de 1567 M. S. do Arquivo de Goa faz referencia ao teatro hindo chamado "Zagor" que costumavam realizar em Goa em certas festividades religiosas.

O Poeta goes Crisnadas Xama (1526) fala de actores (Nattadhara).

या पोर्तुगीज उताऱ्याचा अर्थ असा() गोमंतकातल्या एम्. एस्. दप्तर खात्यातील पंधराशे सदुसष्टच्या 'फोराले'मध्ये जागर नावाच्या हिंदूंच्या नाटकाचा उल्लेख सापडतो. ही नाटके ठराविक धार्मिक जत्रांच्या वेळी केली जात असत.

कृष्णदास शामा नावाचा कवि हा १५२६ साली नटांबद्दलही (नटघर) लिहितो.

ह्या दोन गोष्टींवरून एकच गोष्ट सिद्ध होते ती अशी की १५६७ सालात गोमन्तकात नाटके होत होती. आणि १५२६ सालीही 'नाटक' अस्तित्वात होते (त्याशिवाय नटघरासंबंधी लिहिणे कसे संभवते?) कृष्णदास शामा ऊर्फ सामराज हा एक गोमंतकातील प्राचीन सन्त कवि. ह्याने एक कृष्णचरित्र लिहिले असून ते ब्राग ह्या पोर्तुगालमधील शहरी ठेवण्यात आले आहे. हा ग्रंथ त्याने १५२६ त लिहिण्यास सुरुवात केली. त्यातल्या एका ओवीत तो उल्लेख करतो की त्याकाळी नट मंडळी, वस्त्रे प्रावरणे, विविध प्रकारे लेवून रंगमंचावर येत असत. कवि म्हणतो:

जैसा कां नटघर । तैसे रंगामाजी दोघे वीर
वस्त्रे भूषणे अलंकार । सोबते झाले । ।

(रंग म्हणजे सभागृह, सभामंडप, नृत्यस्थान—नाटकगृह= गीर्वाण लघु कोषान्वये ह्याचा अर्थ गोमन्तकात १५२६ पूर्वीपासून नाट्यपरंपरा चालू असली पाहिजे.)

## जागर

जागराचे दोन प्रकार आहेत. एक प्रकार ख्रिश्चन गावडे समाजाचे लोक व नवहिंदू करीत असतात. तर दुसरा हिंदूंपैकी "पेरंणी" ह्या पारंपारिक गायक जमातीकडून केला जातो.

ख्रिश्चन 'जागर' हा प्रकार लोकनाट्याचाच एक प्रकार असून त्यात धार्मिक-पौराणिक असे काहीही नाही. रचना लोकनाट्याचीच. सादर करणारे समाज-बाटगे ख्रिश्चन आणि पुन्हा हिंदु झालेले नव हिंदु ! ! ह्या जागर प्रकाराला एक सलग असे कथानक नसते. दोन तीन लहान कथा मिळून तो कार्यक्रम साजरा होत असतो. जागरमधील गाणी कोकणी, मराठी तर काही संमिश्र स्वरूपाची असतात. एक जण गाणे म्हणतो. बाकीचे साथ देत असतात. त्यांना पालव म्हणतात (पालुपद धरणारे ह्या अर्थाने) वादनाकरता चार सहा घुमट आणि एक दोन झांजांची जोड असा मेळ असतो. ह्या वादनाचा एक निराळाच बाज असतो. भारतीय व पाश्चात्य ह्यांचा स्वरमेळ ह्यात असतो.

जागराला पडदा नसतो. वेषभूषा असते. रंग सफेती थोडीफार. शिकारी—वाघ वगैरे पात्रे बरोबर दाखविली जातात. बदलता काळ नीट दाखविला जातो. कथानक ऐतिहासिक पौराणिक जसे जमेल तसे असते. काही पात्रे कवने गाताना नृत्यही करतात. ह्या नृत्य प्रकारात दोन भाग असतात. एक प्रकार घुमट वाद्याच्या लयीवर पाय पुढे मागे करीत नाचणे व दुसरा अवघड प्रकार असा की, त्यातील दोन तीन पात्रे आपल्या पायांना तीन साडेतीन हात लांबीच्या बांबूच्या


'समेळ' एक गोमंतकीय वाद्य

काठ्या बांधून मग घुमट लयीच्या अनुषंगाने, गान संवादाबरोबरच नृत्य करतात. हे नृत्य प्रेक्षणीय. हे नृत्य करणारांच्या अंगी विलक्षण चपलता लागते; नृत्यकाराच्या अंगावर त्या त्या जमातीतील स्त्रियांचे दागिने असतात.

## जागर पेरणी

दुसरा प्रकार. सन १५६७ चा. **पेरंणी** या पारंपारिक गायक वादक हिंदु जमातीकडून होतो. रचना प्राचीन नाटक पद्धतीची!

प्रारंभी एक रुपडेधारी सोंगाड्या व जागर करणाऱ्या मंडळींचा सूत्रधार असे दोघे देवाचे नामस्मरण करीत येतात. सोंगाड्या कैक देवांची नावे घेत (वरावणी) तांबड्या फुलांची एक माळ तिथे ठेवलेल्या समईला घालतो (समई—दैवत स्थापना) म्हणजे रंगदेवतेची आराधना केली जाते. पडदे, सजावट नसते. सोंगाड्या दैवताची पूजा करीत असताना सूत्रधार एक स्वच्छ पांढरा पडदा प्रेक्षक व रंगमंचाचे मध्ये धरतो. नंतर सरस्वती व तदनंतर गणपतीचे स्तवन होते. पण पात्र प्रवेशात मात्र प्रथम गणपती व नंतर सरस्वती अशा क्रमाने प्रवेश होत असतात.

नमन झाल्यानंतर गणपतीचे पात्र रंगमंचावर येते व सूत्रधार गाणे म्हणत असेपर्यंत नृत्य करीत राहते. नंतर आत जाते. जाताना गणेशजी वर देऊन जाताना. मग सूत्रधार त्या अर्थाचे गाणे म्हणतो. नंतर कंबरेला मोराच्या पिसांचा पट्टा बांधून एक स्त्रीपात्र प्रवेशते. शारदास्तवन सुरू होते. मग आशिर्वाद, वर देऊन निघून जाते. मग म्हातारी (आदिमाता) येते. ती वेदान्तपर उपदेश करते. जाते. मग एक स्त्री पात्र येते. त्याच्या हाताला एक लाकडी कृष्णमूर्ति बांधलेली असते. ते नृत्य करते—जाते. मग सौदागर, महादेव अशी पात्रे येतात. मग प्रमुख सूत्रधाराकडून आराधना, आगमन, गमन वगैरेची गाणी होतात. हा झाला पहिला भाग.

पुढील भागात मधुभावु, व कीटभावु, ह्या नावाची भलीमोठी लांबडी रुपडेधारी पुरुष पात्रे राक्षसी थाटाने येतात. मधुभाऊ, व कीटभाऊ, म्हणजे मधुकैभट राक्षस. येथून आख्यानाला सुरुवात होते. गाणी—संभाषणे होत असतात. शेवटी राक्षसांचा वध होतो.

यानंतर गायत्री नावाचे स्त्री पात्र येते. ते जागर करणाऱ्या एका पात्राच्या अंगात संचार करते. आणि जागर संपतो. तीर्थ, गाऱ्हाणे प्रकार नंतर होतो.

प्रमुख पात्रे सोडता ईश्वरपात्रात सोयीनुसार कमजास्त केले जाते. मधल्या भागात काही काल्पनिक पात्रे आणून तत्कालीन अभिष्ट चालीरीती, रुढी ह्यावर टीका टिप्पणी केली जाते. उपदेश केला जातो.

वाद्य-ढोलक व कांसाळे (मोठी पत्र्याची झांज) मृदुंग नसतो. ढोलक वादक अति कुशल असावा लागतो.

**"पेरंणी"** ह्या गायक-वादक जमातीचे मूळ स्थान फोंडे महालाच्या खांडेपार गावी व सांगे महालाच्या









अनुक्रमणिका

मळकर्णे गावी होते. नंतर इतरत्रही काही त्यातली कुटुंबे झाली. पण 'हक्कदार' म्हणून मळकर्णेकर व बागमेंकर ह्या गावचे लोकच ओळखले जाऊ लागले. त्यांनी आपापसात निरनिराळी गावे वाटून घेतली व ते त्या त्या गावची जागर नाटके करीत असत. त्याबद्दल त्यांना काही जमिनी इनाम म्हणून दिलेल्या असत. (त्या आजही चालू आहेत) हे लोक शिरोडे ह्या फोंडे महालच्या गावच्या श्री कामाक्षी देवीस भजतात. जागरातही ते देवी उपासक आहेत. पहिला वार्षिक जागर ते बोरी–फोंडा ह्या गावी करतात आणि नंतर ते इतर गावी ठराविक दिवशी जातात. जागरात ते इतर जमातीचे लोक घेत नाहीत. स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्यात असा कटाक्ष व अनादि कालापासून तो ते पाळीत आहेत. त्यासाठी आपल्या कुटुंबातील काही स्त्रिया अविवाहित म्हणून राखून ठेवीत असत. फक्त म्हातारी हे पात्र मात्र स्त्रीरुपधारी पुरुषाचे असे. काही ठिकाणी त्या दिवशी उपोषण करून व्रतस्थ रहात तर काही ठिकाणी रात्री कोंबडीचे बलिदान करून जागराचा प्रारंभ केला जाई. ह्यांची नावे पोर्तुगीज दप्तरात गायक–वादकांच्या यादीत असत. त्यांना सरकारी वेतन दिले जात असे.



आज जागर मागे पडले आहेत. होतात तेथेही ते फारसे उत्साहाने, थाटात होत नाहीत. काही माणसे नाटकांकडे वळली आहेत. तर काही अन्य उद्योगांकडे! आता जागरांच्या ऐवजी नाटके होतात. सुरुवातीला फार तर पडद्याआड जागरातला काही भाग केला जातो.

## काही नाट्यप्रकार

जागर, बाळ क्रीडा, काला, गौळणकाला प्रमाणेच वीरभद्र, त्राटिकावध, पुतनाख्यान इ. नाट्यप्रकारही काही गावी देवस्थानात होत असत. ह्यांचा निश्चित काल सांगणे कठिण. ह्या नाट्यप्रकारात प्रारंभी गणपति–सरस्वती ही पात्रे नसतात. रंगणाच्या ठिकाणी गणपतीची आरती असते तेवढीच. श्री गणेशाची आराधना, सूत्रधार, पडदा ह्यातले काही नाही. स्थळ–खुद्द देवस्थानचा चौक, सभामंडप, महादरवाज्याजवळ किंवा जवळच्या प्राकारात हे प्रयोग होतात. आख्यान ठराविक–चार सहा पात्रे–देव–दैत्य –लढाई. शेवटी दैत्याचा वध. थोडे भाषण–थोडे गाणे. वाद्ये ढोलक. सनईविरहित ताशा, ढोल, कासाळे, वाद्यवादनात रौद्ररसाला प्राधान्य. दोन ताशांचा कार्यक्रम. बाण, चद्रज्योती वगैरे दारुसामान लावतात. जाळ करतात. दैत्यवधाने कथानक संपल्यावर रंगलेली सारी पात्रे (दैत्यासकट) गर्भागाराकडे, देवळात फिरून गाऱ्हाणी करतात. हा लोकप्रिय नाट्यप्रकार मानला जातो.

## बाळ क्रीडाकाला

दशावतारी काल्यासारखा काल्याचा प्रकार. भारदस्त संगीताचा प्राचीन नाट्यप्रकार. रचना संस्कृतनिष्ठ! ह्यात



गोमन्तकीय कवींची कविता व संगीतकारांनी दिलेले संगीत ह्यांचा वापर केलेला असतो. धृपद्धमाजाचे हे संगीत असते. सूत्रधार (नाव 'नसले' तरी) म्हणून 'हरिदास' असतो. पात्रे, युद्ध, नृत्य सारे काही प्राचीन परंपरेनुसार असते.

पडदा नसतो. हरिदासाच्या कडे कडून टाळवादक उभे राहतात. साथ करतात. कोपऱ्यात मृदुंग वादक असतात. प्रथम तास दीड तास नुसते मृदुंग घुमविले जातात. रचना गोमन्तकीय! नंतर गान मृदुंग साथीने सुरुवात होते. पहिल्या मुख्य वादनाला **'मोनी घुमाळी'** म्हणतात. जुन्या वहीत 'घुंवाळ' असे नाव लिहिलेले आढळते. ह्यात पूर्वरंग–आख्यान असे भाग असतात.

पात्रे लाकडी मुकुट, मुखवटे वगैरेचा वापर करतात चतुर्भुज करताना लाकडी हातही लावले जातात.

कालागानातील महत्वाची गोष्ट म्हणज उत्तर रात्र निदर्शक अनोळखी मधुर स्वरांचे चलन. विलावल रागातही काही गाणी आहेत.

## गोपाळकाला

बाळ क्रीडा संपल्यावर थोर सकाळी गोपाळकाला नावाचा एक कालाप्रकार गोमन्तकात फारच थोड्या ठिकाणी होत असतो. ह्यात नाट्याचा भाग नाहीच! रंग–वेषभूषेशिवाय निरनिराळे खेळ खेळून शेवटी दह्याचा गाडगा फोडणे एवढाच उद्योग ह्यात असे. एकवाक्यता नाही. प्रत्येक ठिकाणी स्वरुप वेगवेगळे असे.

बाल क्रीडा काल्यानंतरच्या गोपाळकाल्यात रंग वगैरे नसे. फक्त कृष्ण, बलराम आणि प्रलंभासुर हे रंगत असत. समोरासमोर कृष्ण बलराम प्रलंभासुर पक्ष उभे राहून (सवाल जबाब पद्धतीनुसार) गाणे–नृत्य यांचा वापर करून कूट प्रश्न टाकीत असत. शेवटी बलरामाकडून राक्षस वध. दहिहंडी फोडली जाई. काला संपे.

**मंडण**:—नाटके करणारांना **'मंडळी'** म्हणत बाळक्रीडा काला करणारांना **'मंडण'** म्हणत असत. मंडणात ५०।१०० पर्यंतही माणसे असत. येण्याचे बंधन नसे. उलट मंडणातील **'गडा'** म्हणज देवाचा माणूस ही श्रद्धा. त्यामुळेच संख्येचे बंधन मंडणात जाण्याला विधी असे.

## काला प्राचीनत्व

काल ठरविणे तसे कठिण. पण बाल क्रीडा काला त्याच्या गान वादन पद्धतीवरून, रचनेवरून व ऐकीव माहितीवरून अधिक जुना असावा असे वाटते. निदान दक्षिणेकडील हिंदु राज्याचा अंमल गोमन्तकावर असताना गोमन्तकात काला चालू होता असे वाटते.

पोर्तुगीज १५१० त गोमन्तकात आले. त्यापूर्वी ४० वर्षे विजया नगरच्या 'नायक रायांचे' राज्य गोमन्तकात विद्यमान होते. रायांनी गोमन्तकावर सुमारे १०० वर्षे राज्य केले. म्हणजे १४७० चा पूर्वकाल येतो. गोमन्तकातील बाळ क्रीडा काल्यात

गान–वादन व लय यात दाक्षिणात्य संगीताचा प्रभाव अधिक दिसून येतो. काव्यात कानडी शब्द वरचेवर आढळून येतात. तात्पर्य, काला कानडी राज्याच्या काळापासून हा प्रकार चालत आला असला पाहिजे. काला अति प्राचीन असावा असे दिसते.

## पेटारा

काला–जागराच्या कपडे–रुपड्यासाठी जी बांबूची मोठी पेटी असे तिला पेटारा म्हणत–कंपनीचे सामानात पेटारा असो • नसो 'पेटारा' आला म्हणण्याची पद्धत रुढ होऊन गेली. आणि काला-जागर सामानात एखाद दुसरा माणूस झोपावा इतपत मोठा पेटारा हा असायचाच. हे पेटारेही त्या कालाचे निदर्शक म्हणून मानावयास हरकत नाही.

## नाटकाचा देवधर्माकडे संबंध

गोमन्तकाचा आणि नाटकाचा संबंध हा फार जुना व जवळचा असा आहे. संगीत आणि नाटक ह्या कलांमध्ये त्यातल्या त्यात गोमन्तकाची गति अधिक. धार्मिक व दैवी बाबतीतही नाटकाने ठाण मांडले आहे. लग्नमुंजीत श्रीमंता घरी गाणे व नृत्याचा कार्यक्रम करण्याचा प्रघात होता. तसाच नाटके करण्याचाही होता.

गोमन्तकातील देवस्थानातून ज्या विविध प्रथा पाळल्या जातात त्यातच नाटकाचीही एक आहे. नाटक संपले की रंगलेली काही पात्रे पंचवाद्यांसहित वाजत गाजत गर्भागाराकडे जात आणि काही धार्मिक विधी पार पाडीत असत. वार्षिक 'भोगावळी–बाबी' पूर्वापार चालत आल्या आहेत त्यात नाटकाचा समावेश होतो.

भोगावळ म्हणजे प्रतिवर्षी न चुकता करावयाचा धार्मिक विधी! नाटकाकडे नाटक म्हणून न पाहता भोगावळ म्हणूनच पाहिले जात असे. काल्यातील गणपतीच्या पात्राला भक्तिभावाने उठून उभे राहून नमस्कार करतात. काल्यातील दैवत प्रखर व कामसिद्धीकारक मानले जाते. त्याचा प्रसाद नवसाला पावतो असे मानले जाते.

## जत्रा आणि नाटक

गोमन्तकातील कुठलीही जत्रा–उत्सव नाटकाशिवाय–पार पडत नसे. लहान जत्रातून सुद्धा नाटक हे असेच. जत्रेच्या धार्मिक बाबींचा खर्च कमी. पण नाटकाचा खर्च अधिक होत असे. जत्रा एक दिवस तर नाटके आठ आठ दिवस चालत. नाटकाची सोय पाहून क्वचित प्रसंगी जत्रा चार आठ दिवस मागेपुढे सुद्धा होत असत.

ग्रामीण भागात तर जन्मात एकदा तरी रंग फासून नाटकात काम करणे हे भूषणास्पद मानतात. सोंग घेणे (नाटकात भूमिका करणे) म्हणजे एखादी तीर्थयात्रा करून आल्यासारखे किंवा फार मोठे काम केल्यासारखे मानीत. अशिक्षित माणूसही दुसऱ्याकडून संथा घेऊन का होईना पण नाटकात काम करीत असे. दिग्दर्शक म्हणजे 'तारी' व नट म्हणजे 'गडा' असे म्हणण्याची पद्धत असे.

"श्रीमंत माणसे" मात्र कुठल्याही नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला वाटेल तेवढा पैसा खर्च करून हजर रहात. त्यातला कुणी दिसला नाही तर इतर सोयरे काळजीत पडत. नाटक हा श्रद्धेचा व देवाचा विषय मानला जात असे. नाटक पाहण्यासाठी वाटेल त्या साधनाने, वाहनाने प्रसंगी पायी जाऊनही माणसे उत्साहाने जात. इतके नाटक गोमन्तकीयांच्या रक्तात भिनले आहे.

## हौशी नाट्यसंस्था

चैत्र पौर्णिमा, शिवरात्र, रथसप्तमी, शिशिरोत्सव, वसंतोत्सव, पिंडिकोत्सव ह्या मार्गे समाज किंवा मंडळी हे नाव लावून नाटके सादर केली जात. गावोगाव अशी मंडळी व असे समाज असत. खूप मेहनत करून धंदेवाईक दर्जाची नाटके सादर केली जात. उत्सव एक दिवस तर नाटके आठ आठ दिवस होत. प्रचंड उत्साह व देवकार्य ह्या भावनेने हे सारे होत असे. नाट्यमहोत्सवाबरोबर नटमहोत्सवही होतो. नटांची खूप बडदास्त ठेवली जाते. स्पर्धेने नाटके होत. परंपरेने नाटकात कामे करीत आल्याने त्यातून उत्तम धंदेवाईक नटही तयार होत असत.

सांखळी घराण्यातील श्री. राणे यांचे पूर्वज गोमन्तकात आल्यानंतरच्या काळात (१५४० ते १६००) एका पुरुषाने गोमन्तकाचा पूर्वेकडील सत्तरी प्रांतात तळ देऊन राहून त्या काळच्या तिकडच्या वाडकर राज्यांना न जुमानता तो प्रांत आपला मानणाऱ्या 'घबड' जातीच्या लोकांचे पारिपत्य करण्याचा विडा वाडकर दरबारात उचलला. राणे शूर होता. त्याने घबड प्रमुखांना खेळ कंपनीकडून खेळास आमंत्रण दिले. व त्यास तेथे गाठून तो प्रांत ताब्यात घेतला. वाडकरांनी तो भाग श्री. राणे यांना इनाम दिला.

दिल्ली येथे १९५६ च्या मार्च महिन्यात नाट्याचार्य परिषद

---

**यंदाची संक्रांत** -




**मुंबईत यंदा साजरी झालेली एक नवी संक्रांत !**

---





अनुक्रमणिका




## तुमच्या मुलाला उच्च शिक्षण घेता येईल का?

दहावीच्या परीक्षेंत मुकुंदाला ७१ टक्के मार्क मिळाले, पण त्याला वरच्या वर्गात जाऊन शिक्षण पुढे चालवणें अशक्य झालें आहे. पुष्कळ मुलें हुषार असून पैशांच्या अडचणींमुळें त्यांना शिक्षण अर्धवटच सोडावे लागते. आयुष्यांत थोडी कर्तबगारी करून दाखवायला लागणारी शिदोरीच त्यांना मिळत नाहीं.

तुमच्या मुलाला उत्तम प्रकारें उच्च शिक्षण मिळावे म्हणून तुम्ही निश्चित स्वरूपाची तरतूद केली आहे काय? अशी तरतूद करावयाचा एकमेव मार्ग म्हणजे विमा. ठरलेल्या वेळीं, ठरलेले पैसे तुमच्या मुलाला मिळतील, मग तुम्ही असा वा नसा.

विमा उतरवा आणि आजच तुमच्या मुलाला वरच्या वर्गात घाला.

थोड्याही बचतींत उच्च शिक्षणाची तरतूद करता येते. उदा: तुमचें वय ३०, मुलाचे वय २. दरमहा हप्त्यासाठीं बचत रु. २२.०५, विम्याची मुदत १६ वर्षें. मुलाला दर सहामाहीस ५०० रु. असे ५ वर्षांत रु. ५००० मिळतील.



**आयुर्विम्याला पर्याय नाहीं.**

PRATIBHA 672

झाली. तीत वाचलेल्या निबंधात मामा वरेरकर म्हणतात: १९ व्या शतकाच्या सुरुवातीला गोव्या प्रांतात लिहिलेली नाटकेही करण्याची पद्धत होती.

## गौळणकाला

बाळ क्रीडा काला झाला की दुसऱ्या दिवशी केला जाई. निश्चित काल सांगता येत नाही. देवस्थानच्या परिसरात राहून संगीताने देवसेवा करण्याच्या भावनेने गौळणकाला करीत असत. सुरुवात हरिदासाच्या मंगलाचरणाने होत असे. ह्याचा अर्थ असा की, तो प्रकार जुन्या परंपरेतलाच होता. विविध प्रकारच्या संगीताचा वापर करून केलेली नाट्कली म्हणजे गौळणकाला. आख्यान फक्त श्रीकृष्णाचेच असे. स्त्रिया अधिक, पुरुष पात्रे लहान बयाची, वेळ दुपारची असे. हरिदास प्रारंभ करून व वेदान्ती भाषण करून मागे जाई व मग मधुनमधुन गति देण्याचे काम करीत असे.

गौळणकाल्यात प्रारंभी अभंग, भक्तिगीते, श्लोक, आर्या, व्रजगीते—मध्यंतरात ख्याल व ध्रुपद गायले जाई. मग द्वंद्वगीत, भावगीत, नाटयगीत, नृत्य, कृष्ण सौंगड्यांचे तोतरे गीत वगैरे प्रकार होत. संपूर्ण संगीतमय असा कार्यक्रम होत असे. पेटी तबल्याची साथ—स्थळ—देवस्थानचा मंडप, जत्रेचा मंडप हे! ह्या गौळणकाल्यातून एक उत्कृष्ट नाटककार तयार होऊ शकला असे दिसते. पहिला प्रसिद्ध (छापील) गौळणकाला १९०० सालचा असून त्याचे लेखक **विश्वनाथ पांडुरंग हेदे** होते. १९०५ मध्ये त्या पुस्तकाची त्यांनी सुधारून दुसरी आवृत्ती तयार केली. त्यांचे 'नलदमयंती' हे नाटकही प्रसिद्ध आहे.

श्री. बा. ज. नाटेकर यांचा गौळणकाला १८९० त पहिली व १८९१ त दुसरी आवृत्ती अशा प्रकारे प्रसिद्ध झाला.

श्री. चन्नाप्पा नावाचे म्हापसे बार्देश येथील एक प्रसिद्ध हरिदास. त्यांचा काला पुस्तकरूपाने प्रसिद्ध नाही. आख्यानेही खूप लिहिली. हेदे यांच्या पूर्वीचा काल त्यांचा होता. गौळणकाला लिहिणारी अनेक हरिदास मंडळी होऊन गेली. काही 'काले' प्रसिद्ध झाले. काही झालेले नाहीत पण गौळणकाल्यातून संगीत आणि नाटक यांचा सुरेख समन्वय साधलेला दिसतो.

## नाटकांची संख्या

स्वतंत्र गोव्यात दरसाल ८०० नाटके होतात असे नायब राज्यपाल दामले एका भाषणात म्हणाले. ही फक्त सहा महिन्यात होतात. अर्थ—रोजी चार वा पाच नाटके होतात असे सिद्ध होते.

●●●












**जगात वागावं कसं याचा कित्येकदा मोठा पेच पडतो. त्यादिवशीच्या जनीच्या स्पर्श-सौख्याच्या प्रसंगानं त्यालाही जनीच्या वागण्याचा मोठाच पेच पडला हं !**

# पेच

**जगात** वागावे कसे ? अनादिकालापासून मानवी प्राण्याला पडलेला अनादि पेच आहे. अजून सुटला नाही. कदाचित् सुटणारही नाही. न सुटण्यातच गंमत आहे. काही अनुभवी कर्तबगार माणसे यावर अनुभवसिद्ध ग्रंथ लिहितात. पण पुस्तके वाचून कोणी त्याप्रमाणे आपले जीवन आखीत नसतो. कारण पुस्तक वाचण्यायोग्य वय होईपर्यंत त्याच्या स्वतःच्या पुस्तकाचे काम बायंडिगपर्यंत आलेले असते. पुस्तकाचे वेष्टन कसले तयार करावयाचे, त्यावर अक्षरांची रेखाटणे कसली करायची एवढ्यापुरता दुसऱ्या पुस्तकांचा कदाचित् आधार मिळत असावा. बाकी, संस्कारांची छिन्नी आणि अनुभवांचा हातोडा यांनीच आपली स्वतःची मूर्ती घडवायची असते.

खरं म्हणजे, एवढी प्रस्तावना पाहिजेच कशाला ? मनात फार दिवस घोळतंय्, म्हणून सांगून मोकळा होतो झालं.

माझ्या लग्नाचा योग मात्र मोठा मजेदार. दैव अनुकूल म्हणून मला 'श्यामा' लाभली होती. अक्षता पडल्यानंतर पंधराच दिवसात कोट ऑफ् वॉर्डस्‌मधून आमच्या जमिनीचा कबजा मिळणार होता. तत्पूर्वी एकदोन वर्षे पत्रव्यवहार, अर्ज-उत्तरे यामध्ये जाऊन शेवटी सरकारची मंजुरी मिळाली होती. कबजा वगैरे घेण्यातच पांचसहा महिने गेले. खेड्यात राहण्याचा आम्ही विचारच केला नव्हता. जुनाट घर होते. पण बरेचसे मोडकळीस आलेले. त्यातच थोडीशी डागडुजी करून घेतली. थोडेफार फर्निचरही आणून टाकले. एकदा बायकोलाही घेऊन एक आठवडाभर राहिलो. गावातल्या बायका मालकिणीला भेटायला आल्या. गावकरी वास्तपुस्त करून गेले. इथं कायम बिऱ्हाड जरी नाही केलं तरी मी पुष्कळसा इथंच राहणार आहे हे ऐकून गावातल्या तथाकथित पुढाऱ्यांनी व कांही रयतांनी समाधान व्यक्त केले. गावात पाचसहा भाऊबंदांची घरंही होती. त्यापैकी तिघंच घर करून होते. बाकीचे देशांतराला गेले होते. राहिलेल्या तिघांपैकी बाळासाहेबच काय तो माया वाळगून होता. शेतीवाडी बरी होती त्याची. पण स्वतः काही केलेलं मी तरी कधी पाहिलं नव्हतं. सूत्रं बरोबर हलवून कामं कशी करून घ्यावीत यात तो मुरब्बी होता. दिवसभर तो काय करीत बसे राम जाणे ? पण कोण ना कोण तरी त्याचा सल्ला घेण्यासाठी त्याच्या पडवीत सदैव हजर असे.

मी गावात राहायचे ठरविले. स्वयंपाकाची व्यवस्था लागली. बाळासाहेबही एकदोन वेळा येऊन हवे-नको ते विचारून गेला. त्याच्या बोलण्यात शब्द मोजकेच असत. नजर भेदक असे. त्यात डोळ्यांच्या घारेपणामुळं त्यानं ओढरेला एक न्यारीच धार असे. नाक, राघूच्या चोंचीसारखं बांकदार. तोंडात पानाचा तोबरा सदैव





अनुक्रमणिका

भरलेला असे. डाव्या हातातली चंची कधी सुटली नव्हती.

एक दिवस असाच तो आला. समोरच्या खुर्चीवर बसला. त्याच्यात आणि माझ्यात व्यावहारिक बोलण्याव्यतिरिक्त दुसरा विषयच सापडत नसे. जागतिक घडामोडी-बद्दल बोलावे तर बाळासाहेबाची मर्यादा गावच्या शिवेपर्यंत. वाङ्मय-पुस्तके यांच्या-बद्दल बोलायचं म्हटलं तर बाळासाहेबाचं वाचन, आगगाडीत कधीमधी घेतलेल्या 'चांदोबा' मासिकापलीकडे गेलं नव्हतं. शेतीबद्दल, गावच्या मातीबद्दल कदाचित तो अधिकारवाणीनं बोलू शकला असता. पण मी नवखा होतो ना ?

थोडा वेळ स्तब्धतेत गेल्यानंतर मी गोंद्याला चहा करायला सांगितले. उगाच काहीतरी बोलायचं म्हणून मी विचारले:

'गाव बरा आहे ना ?'

'त्याला काय झालंय् ?'

'माणसं ?'

'माणसासारखीच.'

'तसं नव्हे. . .'

'आपण वागू तशी. .'

'ते झालं हो ! पण एकंदर वातावरण?'

'बरं आहे. पण म्हारवडा असणारच'.

'भांडणं बिडणं ?'

'त्यात आपण कशाला लक्ष घालायचं ? आपण बरं की आपलं काम बरं.'

मग असेच काही निरर्थक प्रश्न आणि निरर्थक उत्तरं.

चहानं सोडवणूक केली. थोड्या वेळानं घरातल्या सामानाकडे दृष्टिक्षेप टाकत बाळासाहेब निघून गेला.

मला सारा दिवसभर काय करावयाचे हा मोठा प्रश्न पडे. पहिले आठपंधरा दिवस जमिनींची पाहणी, रयतांची ओळख, आगतस्वागत यात निघून गेले. शेतावरच्या रयताच्या झोपडीत बसून धारोष्ण दूध प्यालो. कुणाच्या खळ्यावर बसून भाजलेल्या शेंगा खाल्ल्या. नंतर नंतर तोच तोचपणा जाणवू लागला. मग त्यांचं वेळा पुस्तकात मन रमवी. तर कधी बॅटरीवरचा रेडियो लावून ऐकत बसे. पण रेडियोचे बटण दाबले की आठदहा कार्टी गोळा व्हायची. त्यांच्याशी काय विनोद करावा हाच प्रश्न पडे. मला त्यांची भाषा समजत नव्हती किंवा त्यांना माझ्या पुरीटघडीचे भय वाटत होते. कोण जाणे ?

एक दिवस संध्याकाळी असाच लांबवर शेतावर फेरफटका मारण्यास निघालो. वाटेत बाळासाहेबास हाक मारावी व त्याला बरोबर घ्यावे म्हणून मी त्याच्या घराकडे वळलो. पण त्याची बैठक रंगली होती. त्याच्या पडवीत आठदहा माणसे बसली होती. चंची एका हातातून दुसऱ्या हातात चवचाल स्त्रीसारखी फिरत होती. कुणीतरी 'इची भनं. . . .' असं म्हटलं आणि हंशाचा मळा पिकला.

कशाला त्याच्या रंगलेल्या बैठकीचा भंग करा असा विचार करून मी त्यांच्या कुणाच्याही दृष्टीस न पडता सटकलो.

## ना. व्यं. देशपांडे

आज कुणाकडे मोर्चा वळवावा बरे ? जानू शेळकेच्या शेतावर जावे. त्याला मी नुकतीच एक जमीन लावून दिली होती. पाच वर्षांच्या करारानं. बाळासाहेबाच्या शिफारशीनंच. बाळासाहेबाची जमीनही तो करीत होता. खात्रीचं कूळ म्हणून बाळासाहेबानं मोजक्या शब्दात त्याची शिफारसही केली होती.

मी जानू शेळक्याच्या शेताकडे जायला निघालो. जानू खोपटापुढ बकरीला पाला घालीत उभा होता. माझ्याकडे नजर जाताच तो झटकन् पुढे झाला. 'रामराम सरकार' असं म्हणत त्यानं झोपडीपुढं कांबळं अंथरलं. झोपडीत जाऊन एक मळकीशी चादर अंथरली. 'बसा जी.' असं म्हणत माझ्यापासून थोड्या अंतरावर तो बसला.

'हंगाम संपलाय् जी. . म्हाईतर हुरडा आणून दिला असता.' तो अजीजीनं म्हणाला.

'अरे, या हंगामात नाही तर पुढच्या हंगामात. . .'

'तरीपण. . . पैल्यांदाच आलासा. वाईच दूध देऊ का ताजं ?'

मी नको नको म्हणत असता, त्यानं पेलाभर दूध आणलंच. पेल्याच्या काठाशी आलेल्या फेसावर फुंकर मारीत मी ते दूध गटागटा पिऊन टाकले.

इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यानंतर मी जानूला विचारले:

'जानू, गावात भांडी घासायला कुणी मिळतंय् का बघ की.'

'माझी कारबारीन घासेल की जी'.

'छे ! छे ! रयताच्या बायकोनं कधी घासलीत काय भांडी !'

'तसं न्हवं म्हाराज. आपली सेवा कराया आम्हा लेकरांना कां लाज वाटावी ? पोटाला घालणारं तुम्हीच अन् मारणारं बी तुमीच . .'

'तरी पण. . . .'

'तसं काय मानू नका जी. बाळासाहेब सरकारांच्याकडं नव्हती का पूर्वी भांडी घासत ? लई चांगलं माणूस बघा. सर्वीकडे बारीक लक्ष. कुणाची नड त्यांनी भागवली न्हाई असं कंदी व्हायचं न्हाई.'

'मग आता कां नाही करीत काम ?'

'आता त्यांचं कुटुंब आलया. त्यास्नी तिचं काम त्यवढं पसंत पडलं न्हाई बघा. हिचं वेळेवर कुठं घडचाळागत जाणं हुतय् ? बाळासाहेब एकटे व्हते तवा निबवून घ्यायचे, सांभाळून घ्यायचे. आता कारभार वेगळा.'

'बरं. मग उद्यापासून येऊ दे कामाला.' मी उठत म्हणालो.

'जी' त्यानं रामराम केला आणि शेताच्या शिवेपर्यंत तो पोचवायला आला.

दुसऱ्या दिवशी जना भांडी घासायला आली. आलेल्या दिवशीच तिनं पोपडे निघालेली जमीन पाहिली.

'बाई. . . बाई. . . बाई. . किती दिवसात जमीन सारवली नाही जी ?' ती लांब जीभ काढत म्हणाली.

पुस्तकातले लक्ष न काढता मी म्हणालो, 'मग काय करतेस ?'

'आता सारून घेतो की वं दोन मिलटात.' तिनं गुडघ्यापर्यंत ओचे सावरले.









अनुक्रमणिका

न्हाणीघरात जाऊन वारडी आणली. परसातून शेणाचा पोहा आणून कालवला आणि ती जमीन सारवू लागली.

हे मी हालचालीवरूनच जाणत होतो.

'आता व्यनीसायबास्नी कंदी आणणार जी ?'

'आँ ?' मी पुस्तक मिटले.

प्रथम दिसला तिचा कोपरापर्यंत गोंदवलेला गोरापान हात. अगदी कसबी कारागिराप्रमाणं तिचा हात शेणखळचाची अर्धवर्तुळं जमीन गिरवीत होता. क्षणाक्षणाला जमीन गुळगुळीत होत होती. आकार घेत होती.

माझी गडबड उडालेली बघून ती माझ्याकडे पाहून तोंडभरून हंसली. ते हसणे कसे स्क्रूसारखे शिरून गच्च रुतून बसले.

'हां. . .हां . . वयनीसायबास्नी होय. आणीन की केव्हातरी अघून मधून ?'

ती पुनः जमीन सारवू लागली. मध्येच तिचा डोक्यावरचा पदर वाऱ्यानं उडाला. तेल न लावलेले तिचे रुखे केस वाऱ्यावरोबर उडू लागले. हात शेणानं भरल्यामुळे तिला तो परत डोकीवर घेताही येईना.

मी आता न राहवून उठलो. टेबलाच्या खणात ठेवलेले, आदल्या दिवशीच आलेले माझ्या 'श्यामे'चे पत्र वाचू लागलो. 'या पुढच्या कोऱ्या जागेवर मी ओठ टेकवले आहेत. . . .'

होय. अन् त्याच कोऱ्या जागेवर मी कालपासून पन्नास वेळा ओठ टेकले होते. आताही सारवण करीत असलेल्या जनाकडे पाठमोरा होऊन मी पुनः त्याच जागी ओठ टेकले आणि नव्या नवलाईचे नुकतेच सरलेले दिवस आठवीत राहिलो.

सारवण आटोपून जना हात पुशीत पुनः आली. 'आता भांडी घासायला थोड्या वेळानं येतो जी. . . तवर भाकऱ्या थापून येतो.'

'लौकर ये. उशीर करशील ?'

'उशीर कशाचा जी ? इथंच पलीकडं घर हाय्.' असं म्हणत माझ्याकडे बघत हंसत गेली. तिचे दात अतिशय स्वच्छ असल्याचे माझ्या आता ध्यानात आले.

मी 'श्यामे'चे पत्र पुनः पुनः वाचीत पलंगावर पडून राहिलो. केव्हा डोळा लागला ते समजले नाही.

गोंद्याने मला जागे केले. 'साहेब, आंघोळीला पाणी काढलंय्.'

मी लगबगीने उठलो.

न्हाणीघराच्या दारांना कड्या घातल्या. नेहमीच्या संवयीप्रमाणे पश्चिमेकडील दार अर्धवट उघडे ठेवले. उजेडासाठी. मला मोकळ्या न्हाणीची सवय नव्हती. वरे, दारे लावली तर न्हाणीघरात गडद काळोख होई. पश्चिमेकडच्या बाजूला परसदार होते. तेथे कुणाचा वावर नव्हता. एक बोरीचे झाड अवाढव्य पसरले होते. आणि कांट्याकुटयांनी गर्दी केली होती.

मी मुक्तमनाने स्नान करू लागलो.

पुनः माझ्या श्यामेची आठवण अंगावरून निथळू लागली. गोंद्याने कढत पाणी उपसून ठेवले होते.

दोन्ही भुवयांच्या जुळणीच्या थोडेसे वर. श्यामेची आवडती जागा. अजून तिथे हुळहुळल्याचा त्रास होत होता.

दोन तांबे ओतून घ्यायचे... तिच्याकडून अंग चोळून घेतल्याची आठवण व्हायची. हात थंडे पडायचे. स्वतः अंग चोळून घ्यायला मनच होईना.

पश्चिमेकडच्या दाराच्या पलीकडे भांडी सरकवल्याचा आवाज आला. . . .

जना आली होती. अंगाभोवती टॉवेल गुंडाळावा असे पटकन् शहरी मनाला जाणवले. पण लगेच तिचा दारापलीकडून संवाद सुरू झाला.

'वयनीसायबांचं माहेर कोणतं जी ?'

मी आतून उत्तर देत होतो. . .त्याच अवस्थेत. . .

'आम्हाला लग्नाला बलवायला विसरलासा. . .'

'हुं'

'आता त्या आल्या म्हंजे हक्काचं लुगडं मागून घेतो.'

'हो . . . घे ना.'

'वयनीसायबांना सोडून करमत जी तुम्हाला ?'

हा तिचा चोंबडेपणा म्हणावा की खेडेगांवातला निर्भर निर्व्याजपणा म्हणावा ? मी संभ्रमात पडलो. बोलता बोलता ती चटकन् दार लोटून आत आली तर? माझा थरकाप होई. असं अघटित घडू नये... तिच्या.... अन् नंतर माझ्या हातूनही....

मग असं रोजच होत चाललं.

बाहेरून तिची प्रश्नावली.

आतून माझी नग्न उत्तरे.

माझी भीड चेपली होती. आता त्याचे काय वाटेनासे झाले होते. मात्र त्या सहा इंची फटीतून तिच्या हिरव्या चुडयांचा, हिरव्या गोंदणांनी भरलेला गोरा गोरा हात मात्र जेव्हा दिसे तेव्हा मात्र माझी नजर खिळून राही.

एकदा दुपारी जेवण करून आडवा होण्याच्या तयारीत होतो. जना तेथे लगालगा आली.

'पाय चेपून देऊ जी ?'

'नको. कशाला ? चादरीखाली लपलेली पावलं संकोचानं लाजली.

'तुम्ही शहरातली मानसं. कधी न्हाई त्ये इतकं शेतावरनं इथं फिरून येतासा. दुखत असतील तर काय ?'

मी काही उत्तर द्यायच्या आत तिनं माझ्या पायावरची चादर दूर केली नि माझी पावलं दाबू लागली. शेणखळचात आणि मातीत राबणारे हात इतके मऊ लुसलुशीत असतील याची मला कल्पना नव्हती. . . माझ्या 'श्यामे'च्या व्यतिरिक्त कुणाचा हात माझ्या पायांना आजवर लागला नव्हता.

मी म्हणालो : 'असं नोकरांकडून, बायकांकडून पाय चेपून घेणं आवडत नाही मला.'

ती खळाळत हुंसत सुटली. 'अगो बया. अवं ही रीतच हाय हिथली... आमची आई सांगत असं.ये नेहेमी. थोरले सरकार व्हते तेव्हा तीच पाय चेपीत असे..... आता तुम्ही शहरातले. . तिकडंच ल्हानपण गेलं तुमचं... अवं, आम्ही रयत लोक. लेकरं





तुमची. आमची सेवा घेतलीच पायजे...'

हवं हवं वाटत असताही मी 'पुरे' म्हणालो. मग जनाचं पाय चेपणं थांबलं.

मी माझ्या 'श्यामा'ला पत्र लिहिलं त्यात हे सारे प्रसंग एकाद्या त्रयस्थाप्रमाणं लिहिले. पुढे लिहायला विसरलो नाही: 'प्रथम प्रथम मला संकोच वाटे. आता मला त्याचे काही वाटत नाही. पाप पाप म्हणतात ते मनात असते बघ. आता मन सरावले आहे, सावरले आहे. जना करते ते सेवा-भावनेने..आपुलकीने. आपण जसे पाहावे तसे आपणास दिसते. माझे मन स्वच्छ आहे. नाहीतर तुला इतक्या विस्ताराने कशाला सारे लिहिले असते ?'

शहर सोडून बरेच दिवस झाले होते. शेतीची प्राथमिक कामे आटोपली होती. सहासात दिवस विश्रांती घेऊन यावे असे ठरवून मी शहरात निघून आलो.

जातेवेळी, परत येताना नवे लुगडे आणण्याची आठवण करून देण्यास जना विसरली नाही.

शहरात आलो. तीनचार दिवस पुनः कैफात घालवले. 'श्यामा'च्या मिठीत जनाच्या आठवणी सांगत बसलो. तिची वडवड, तिचा चोंबडेपणा.. माझे मन कसे निर्विकार वगैरे वगैरे.

पाचसहा दिवसांनी गांवी परतलो. इकडे विपरीतच घडलं होतं !

घरात पाऊल टाकले अन् मी स्तंभितच झालो. जानू आणि जना घरात बसलेली. जानूचा पुढचा दात पडलेला दिसत होता. जनाच्या हातावर आणि गालावर माराच्या खुणा दिसत होत्या. माझे पाय उंबऱ्याच्या आत पडताच उभयतांनी माझे पाय घट्ट धरले. आणि दोघंही ओक्साबोक्सी रडू लागली. मला काय समजेनाच. मी त्या दोघांना उठवण्याचा प्रयत्न केला.

'काय झालं ? काय प्रकार आहे ?' मी विचारले.

'गांवच्या लोकांनी मारलं सरकार... बाळासाहेब सरकारांनी मारवलं आम्हासी.'

'कां ? पण कां ?'

'ते त्यास्नीच माहीत सरकार. मला शेतावरून हाकलून दिलं. आणि काल ढोरावाणी बडवलं सरकार. आता काय न्याव् द्यायचा तुमीच घेवा. तुमच्या पायाशी प्राण द्या म्हटलं तर प्राण देतो ?'

जना रडू लागली. तिनं आपली पाठ उघडी करून दाखविली. माराचे वळ अजून तांबूस हिरवे दिसत होते.

'Monstrous' मी त्वेषाने माझ्याशीच उद्गारलो.

'आम्ही ठाण्यावर वर्दी द्यायला निघालो व्हतो. पण काही लोकांचं म्हणणं पडलं की आपण येईपर्यंत आम्ही थांबावं म्हणून आपल्या वाटेकडे डोळं लावून बसलो व्हतो बघा...'

इतक्या थोड्या अवधीत एवढा मोठा विश्वास संपादल्याच्या जाणीवेनं माझ्या अंगावर मूठभर मास चढलं.

या प्रकरणाची चौकशी करण्याचं आश्वासन देऊन मी त्या दोघांना वाटेला लावलं.

त्यादिवशी आंघोळ करताना जनाची चर्पटपंजरी ऐकायला मिळाली नाही म्हणून चुकल्या चुकल्या सारखे वाटत होते. मन उद्विग्न झाले होते. कशाचा मेळ बसत



अनुक्रमणिका








## कोल्हाट-उड्या

### तुझी कविता

तुझी कविता – कविता म्हणजे..
चोवीस तासाचा प्राण्याचा नळ,
हेही काही कमी नाही ——
पाणी नेहमी असावे जवळ !

### 'ओव्हरटाईम'

ओव्हरटाईम काम करणाऱ्या
कारकुनाच्या ओठांपाशी
एक लोचट जांभई आली;
साहेबांचा आवाज ऐकताच
हळूच आत पळून गेली !

### लोकशाही

हल्ली आहे लोकशाही
नुसती मस्ती चालत नाही;
मस्तीवाल्यांचा 'ग्रुप' करावा
सव्वाशेराचा प्रसाद धरावा
असे केल्याने काय होते——
'हाती घ्याल ते तडीस जाते !'

### रहस्य

बाहेर झगझगीत
दिवे लावून
आत——अंधारात रमणाऱ्या जीवा,
तुला प्रकाशाचे रहस्य कळले नाही
अंधाराचे तर नाहीच नाही !

### दिवटी

दिवटी, तुझी फुरफुर किती
किती नाचशील—
स्वतःभवती !
बाहेरच्या वाऱ्याने घालता फुंकर
उडून जाईल नकटे घर !

–डॉ. वि. म. कुळकर्णी

नव्हता. आडाखे चुकले होते. एकूण बाळासाहेब अशी वल्ली आहे तर ! ही दोन्ही बिचारी पोलीसात वर्दी द्यायला गेली असती तर बाळासाहेबाला चतुर्भुज व्हायला वेळ लागला नसता. बाळासाहेबाव : फौजदारी ? आपल्याच घराण्याची अब्रू ! अस्सा राग आला होता बाळासाहेबाचा. चांगली खरडपट्टी काढतो लेकाच्याची. असहाय्य, निरपराधी स्त्रीला मारहाण करायची म्हणजे काय ? शुद्ध मोगलाई झाली की !

जवताना गोंद्याला विचारले. त्यानं नुसतं एवढंच उत्तर दिलं, 'काल बाळासाहेबांच्या वयनींचं आणि जनीचं कशावरून तरी भांडण झालं. तिनं वयनींना शिव्या दिल्या. चार चौघांत, चव्हाट्यावर. त्यामुळं लोक चिडले आणि तिला पायतणानं आणि काठीनं वडवून काढलं. तिचा नवरा सोडवायला गेला तर त्यालाही चार दणके हाणले लोकांनी.'

जनानं शिव्या घातल्या ? तोंडभरून गोड हंसणारी जना. तिनं शिव्या घातल्या ? नाजूक कलाकुसरीच्या गोंदणानं भरलेल्या हातांनी जनानं हातवारे केले ? पटत नव्हते. मी आपल्यापुरती न्यायालयीन चौकशी करण्याचे ठरविले. नोकरांना बोलाविले, रयतांना आमंत्रिले. प्रत्येकाला एकीकडे बोलावून खरे खुरे सांगण्याचा आग्रह धरला. पण सगळे चोर साले. प्रत्येकजण विशिष्ट मर्यादेपर्यंतच खरं बोलत होता अन् दुसऱ्याची री ओढत होता.

एकंदर हकीकतीवरून मनात अंधुक अंधुक प्रकाश पडत होता. पण स्पष्ट होत नव्हते.

दाजीबा शिप्याला बोलता बोलता मी एक पेच टाकला. 'दाजीबा, हे बघ. मला मागचं सांगायचं नसेल तर नको सांगूस. पण या बायका एकमेकांना काय शिव्या देत होत्या रे ? ते तरी सांगशील की नाही ?'

जरा खाकरत दाजीबा म्हणाला... 'आता तुमच्यासारख्यांना कसं सांगायचं जी ? पण जनी आणि जानू लई वंगाळ माणसं.. आता आपल्या पदरी हैत म्हणून आपलं बोलायचं न्हाई... पण पण... नव्हंच त्ये.'

'अरे पण, तुला मी विचारलं काय ?'

'शिव्या.'

'तेच ते. सांग आता.'

दाजीबानं शक्य तितक्या सुसंस्कृत भाषेत सजवून तो प्रसंग सांगितला; "ही जनी म्हणाली बाईसायबास्नी सरकार, –अगो. बाळंतपणात माहेरी गेली व्हतीस तंवा तुझ्या नवऱ्याची शेज मीच सजवली गं सटवे. आणि आता वर तोंड करून बोलतीया.. आता यवढी अब्रू चव्हाट्यावर काढल्यानंतर गांव गप्प बसतया होय ?"

मी दाजीबाला रजा दिली.

त्यानंतर मी गना शेलाराला बोलावलं.

त्याला इतर काही विचारायच्या भानगडीतच पडलो नाही मी. गना हा गावातला पुष्कळसा वृद्ध गृहस्थ होता. त्यामुळं त्याच्या म्हणण्याला लोक थोडं फार मान देत. मी सारी हकीकत गृहीत धरूनच म्हणालो. गना, झाला प्रकार काही चांगला झाला नाही. असं बाईमाणसाला मारवडव करणं चांगलं नाही बुवा.'

'चांगला परकार न्हवं हे म्हणतासा ह्ये खरंच' असं म्हणून गना थोडा वेळ स्तब्ध बसला. माझ्या बाजूने एक तरी मत आहे हे जाणून मला आनंद झाला. शेवटी देव जागा असतो म्हणायचा कुणाच्या तरी हृदयात.

नंतर गना बोलू लागला: 'मग आमी काय करायचं हुतं म्हणतासा ? ही अशी गांवभवानी. सगळ्यांच्यावर ववाळून टाकलेली. अशी सरकारांची अब्रू तिनं चव्हाट्यावर काढायची आन् आम्ही ती गुमान ऐकून घ्यायची ?' मी त्याला मध्येच अडवीत हलक्या आवाजात विचारले. 'काय रे......बाळासाहेबाचा आणि तिचा सबंध होता काय रे ?'

गनानं किलकिल्या नजरेनं माझ्याकडे पाहिलं अन् दोन्ही कानशीलांवर हात ठेवीत तो म्हणाला, "ह्य द्येवाला माहीत सरकार ! असल्या गोष्टी काय डोळ्यादेखत घडत्यात ? पण मी इच्यारतो तुमास्नी, आमचं काय चुकलं ? आम्ही सरकारांची अब्रू अशी जात असलेली गुमान ऐकून घ्याली, गुमान बघत राहावी का ? आता तुमचंच बगा जी. ती रांड तुमच्याकडे काम करते. वयनीसाहेब इथं नसत्यात. तुम्ही अंगुळीला बसतासा त्यावेळी ती बिनबूक भांडी घासाया येते. आता उद्या हीच गांवभवानी आपल्या संबंदानं काही अचावाचा बोलू लागली– तिचा वं कुनी भरोसा द्यावा ?– आणि आमी तिचं बोलणं गुमान ऐकून गप्प राहावं म्हणत असाल तर बसतो बापडे..... कसं ?'

गना शेलार माझ्याकडे किलकिल्या नजरेनं व प्रश्नार्थक मुद्रेनं पाहात राहिला.

आणि मी माझी न्यायालयीन चौकशी बेमुदत स्थगित केली।

●●●



अनुक्रमणिका




# हृदय परिवर्तन

—प्रा. रा. वि. सोवनी



श्री. आणि श्रीमती वाश्कान्स्की

***दक्षिण आफ्रिकेतील केपटाऊनच्या वाश्कान्स्की नावाच्या एका आफ्रिकन रोग्याच्या दुर्बल हृदयाच्या जागी अपघातात निधन पावलेल्या एका तरुणीचे हृदय बसविण्याची अभूतपूर्व शस्त्रक्रिया डॉ. बर्नार्ड नावाच्या शस्त्रक्रिया तज्ञाने केली. साऱ्या जगात खळबळ उडवून देणाऱ्या या हृदय-मीलनाच्या क्रांतिकारक शस्त्रक्रियेची ही रंजक माहिती....***

**सर्वोदयी** तत्वाप्रमाणे दरोडेखोरांचे हृदयपरिवर्तन करून त्याना योग्य मार्गावर आणता येते. तत्वत: हृदयपरिवर्तन करावयाचे म्हणजे त्या व्यक्तीच्या विचाराना चांगली दिशा लावणे. ह्या घटनेत प्रत्यक्ष हृदयाशी संबंध येत नाही. परंतु आजचे शल्यशास्त्रज्ञ खुद्द हृदयाचे परिवर्तन घडवू पाहात आहेत. प्रत्यक्ष परिवर्तनाची घटना गेल्या वर्षीच्या तीन डिसेंबरला केपटाऊनमधील एका रुग्णालयात उरकण्यात आली. लुई वाश्कान्स्की ह्या आफ्रिकन माणसाचे जुने हृदय काढून त्या जागी डेनिज डरव्हॉल नावाच्या एका तरुणीचे निरोगी हृदय बसविण्यात आले. डॉ. ख्रिश्चन निथलिंग बर्नार्ड ह्या शल्यशास्त्रज्ञाने लुईला नवे जीवन दिले. दुर्दैवाने लुईचे हे नवजीवन त्याला अल्पकाळच लाभले परंतु शल्यक्रिया जगतामधील एक अभूतपूर्व गोष्ट मात्र यशस्वी झाली. आज जरी लुई जिवंत नसला तरी नवजीवनदायी शस्त्रक्रिया कशी करण्यात आली हे समजून घेणे आवश्यक आहे.

गेल्या वर्षीच्या सप्टेंबर महिन्याच्या सुमारास लुईला केपटाऊनच्या ग्रूटी श्कूर रुग्णालयात हृदयविकाराचा रोगी म्हणून दाखल करण्यात आले. रुग्णालयात येण्यापूर्वी त्याला दोन वेळा झटका येऊन गेला होता. हृदयाच्या स्नायूंना रक्त पुरविणारी वाहिनी आतून जाड झाल्यामुळे जवळ जवळ संपूर्ण बंद झालेली होती. ह्याचा परिणाम म्हणून हृदय क्षीण झाले होते. त्याचबरोबर त्याचा आकारही दुप्पट झाला होता. शरीराला सूज आली होती. लुई फार दिवसांचा सोबती नव्हता. डॉ. बर्नार्ड ह्यानी लुईच्या शरीरात मिळाल्यास दुसरे सशक्त हृदय बसविण्याचा विचार केला. लुईला त्यांनी विचारले की तू हृदय बदलण्याची शस्त्रक्रिया करून घेण्यास तयार आहेस का ? त्याने ताबडतोब आपली संमति दिली होती.

डरव्हॉल कुटुंब आपल्या गाडीतून प्रवास करीत होते. दुकानातून केक आणण्यासाठी गाडी थांबल्यावर मिसेस् डरव्हॉल आणि डेनिज डरव्हॉल ही दुर्दैवी जोडी रस्ता ओलांडू लागल्या इतक्यात त्यांना रस्त्यावरून जाणाऱ्या एका गाडीचा प्रचंड धक्का बसला. मिसेस डरव्हॉल जागच्या जागी ठार झाल्या. डेनिजचे डोके व मेंदू ह्यांचा चुराडा झाला तरी तिच्यात थोडीशी धुगधुगी शिल्लक होती. डेनिझला ग्रूटे श्कूर रुग्णालयात आणले व डॉ. बर्नार्ड ह्यांच्या ताब्यात देण्यात आले. त्यांनी डेनिझच्या वडिलाना एका बाजूला बोलावून सांगितले, "आम्ही आमच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. डेनिझ जगेल असे वाटत नाही. आपण तिचे हृदय घेण्याची परवानगी द्या." डेनिझचे वडील क्षणभर गप्प राहिले पण नंतर लगेच म्हणाले "तिची आशा नाही तर निदान दुसऱ्या माणसाचे जीवन वाचविण्याचा तुम्ही अवश्य प्रयत्न करा." डेनिझचे हृदय घेण्याच्या करारपत्रावर त्यांनी सही केली.

त्यानंतर वैद्यकीय जगतामधील एका महान प्रयोगाची सुरुवात झाली. दोन वेगवेगळ्या शस्त्रक्रियागारात लुई आणि डेनिज ह्याच्या शरीरावर कुशल हातानी शस्त्रक्रिया सुरू झाली. डेनिजचे हृदय काढून घेण्यात आले. कापण्यापूर्वी ते हृदय कृत्रिम हार्टलंग यंत्राला जोडल्यामुळे त्यातून रक्ताचे अभिसरण होत राहिले व ते जिवंत ठेवण्यात आले. त्यानंतर त्या हृदयाचे तपमान जवळ जवळ पंचवीस अंशानी कमी करून त्याची








अनुक्रमणिका

जीवनशक्ति खर्च होणार नाही अशी व्यवस्था करण्यात आली.

इकडे लुईच्या हृदयाजवळ डॉक्टर पोहोचले. त्याचे हृदय मुख्य वाहिन्यांपासून अलग करावयाचे होते. मानवी हृदयाला दोन वरचे (म्हणजे कर्णिका) व दोन खालचे (म्हणजे जवनिका) असे चार कप्पे असतात. उजव्या कर्णिकेत शरीराकडून येणाऱ्या दोन महानीला अशुद्ध रक्त ओततात. उजव्या जवनिकेतून फुफ्फुस रोहिणी हे रक्त शुद्धीकरणासाठी फुफ्फुसात नेते. डाव्या कर्णिकेत चार फुफ्फुस नीला शुद्ध रक्त आणतात व डाव्या जवनिकेतून महारोहिणी हे रक्त शरीराला पुरविते.

शस्त्रवैद्य बर्नार्ड ह्यांनी डेनीझच्या हृदयाजवळील सर्व रक्त वाहिन्या कापून ते तिच्या शरीर पोकळीतून अलगद बाहेर काढले. शरीराबाहेर असलेल्या ह्या हृदयाला यंत्रामार्फत शीतशुद्ध रक्ताचा पुरवठा चालू ठेवला होता. नंतर लुईच्या विकारीत हृदयाला बर्नार्डनी हात घालून तेही अलग केले. परंतु वेगळे करताना त्या हृदयाच्या वरच्या दोन्ही कर्णिकांच्या भित्तिकांचे भाग तसेच ठेवले. त्या भागात दोन महानीला व चार फुफ्फुस नीलांची तोंडे होती. डेनिझचे हृदय लुईच्या हृदयाच्या उरलेल्या भागाना जोडण्याचे कुशल व अवघड काम डॉ. बर्नार्ड यानी सुरू केले. कर्णिकाना कर्णिका शिवून टाकल्या. डेनिझच्या 'हृदयाच्या' रक्तवाहिन्या लुईच्या रक्तवाहिन्याना शिवून टाकल्या. डेनिझचे हृदय लुईच्या हृदयापेक्षा निम्मे होते. परंतु तरी ते चपखल बसविण्यात बर्नार्ड ह्याना यश मिळाले.

शरीरावर चाकू लावल्यापासून चार तासाच्या प्रदीर्घ व अविश्रांत श्रमानंतर डेनिझचे हृदय लुईच्या शरीरात स्थानापन्न झाले. नव्या जागेतील थंड पडलेल्या डेनिझच्या (आता लुईच्या) हृदयाला विद्युत् प्रवाहाने चेतवणी दिली व ते स्पंदन करू लागले. हृदयाला जोडलेले यंत्र बंद करण्याची आज्ञा डॉ. बर्नार्ड ह्यांनी दिली. परंतु ह्या हृदयाला नव्या जबाबदारीची अद्याप जाणीव झालेली नव्हती. कारण ते यंत्राबरोबरच बंद पडले. पुन्हा यंत्र सुरू केले व दहा मिनिटानी बंद केल्यावरही नवे हृदय कार्यक्षम राहिले. प्रयोग यशस्वी झाला. लुईच्या छातीवरील छेद मिटून टाकण्यात आला व शस्त्रवैद्य बाजूला झाले.


डेनिझचे हृदय



लुईचे शिल्लक व काढलेले हृदय



बदलले हृदय

हृदयाची अदलाबदल तर झाली. साऱ्या जगाने त्याचे कौतुक केले. लुई तीन आठवडे उत्तम रितीने जगला. परंतु पुढे न्यूमोनियाने त्याचा बळी घेतला. प्रत्यक्ष लुईचा जरी मृत्यु झाला तरी शस्त्रवैद्यानी एक अतुलनीय कामगिरी पार पाडली. शस्त्रक्रिया करणे हे काम त्यामानाने यांत्रिक व सुलभ. परंतु मुख्य प्रश्न असतो तो हाकी ही अदलाबदल निसर्गाला (म्हणजेच शरीराला) कितपत मानवते? मानवी शरीराचे एक वैचित्र्य आहे. त्या शरीरात कोणताही पाहुणा (फॉरीन बॉडी) आला की त्याला प्रतिकार करून हाकलून देणे मग तो पाहुणा चांगला असो अगर वाईट असो. लुईच्या शरीरात तर नवे हृदय बसविले. त्याने लुईला जीवदान दिले. लुईला जरी हे मान्य असले तरी त्याच्या शरीराला ते मान्य नव्हते. ज्याप्रमाणे रोगजंतू शरीरात आला की त्याला नाहीसा करण्यासाठी प्रतिद्रव्य (अँटीबॉडी) तयार केले जाते त्याप्रमाणे लुईच्या शरीराने डेनिझच्या हृदयाच्या पेशीना मारक ठरणारे प्रतिद्रव्य निर्माण केले. हा प्रकार होऊ नये म्हणून डॉक्टरानी लुईच्या शरीरावर विविध उपचारांचा मारा केला होता. त्यामुळेच तो निदान तीन आठवडे जिवंत राहिला.

लुईच्या शरीरामधील नैसर्गिक प्रतिकार शक्ती बाह्य उपचाराने कमी झाल्यामुळे त्याच्या शरीरात शिरलेल्या न्यूमोनियाच्या जंतूना विरोध करणे शक्य झाले नाही. ह्या रोगजंतूंचा नायनाट करण्यासाठी डॉक्टरानी पेनिसिलीनच्या खूप मोठ्या मात्रा दिल्या तरी ते जंतू हटेनात. इकडे तर त्याच्या शरीरामधील प्रतिकार शक्तीही खलास झालेली होती. शेवटी लुईला न्यूमोनियाने खाऊन टाकले. शेवटपर्यंत त्याचे नवे हृदय उत्कृष्ट कार्य करीत राहिले. त्यावरूनच ही अद्वितीय शस्त्रक्रिया यशस्वी झाली असे म्हणता येईल.

हृदयाच्या अदलाबदलीचा प्रयोग काही अंशी सफल झाला असला तरी त्यामुळे अनेक नवे प्रश्न उभे राहिले आहे. एखाद्याचे हृदय थांबले म्हणजे तो मृत्यु पावला असे समजले जाते. परंतु हृदय थांबले म्हणून त्याच्या शरीरातले इतर अवयव मरत नाहीत. ते काही काळ जिवंत असतात. त्यांना हृदयामार्फत होणारा रक्ताचा पुरवठा थांबला म्हणजे मग ते मरतात. पुष्कळ वेळा असे थांबलेले हृदय परत सुरू करण्यात येते. अशावेळी ज्याचे हृदय पुन्हा कार्यान्वित झाले तो मेला होता असे कसे म्हणावे? दुसरे असे की हृदयाची अदलाबदल होण्यासाठी बसविले जाणारे नवे हृदय अगदी ताजे असावे लागते. मग ते मिळविण्यासाठी डॉक्टर प्रेत पळवून नेणारी भूते होतील. अगर ताजे हृदय मिळावे म्हणून एखाद्याला मारतील की काय असे चमत्कारिक प्रश्न निर्माण होत आहेत.

[ पृष्ठ ४७ वर ]

**‘दीपावली’तून क्रमशः प्रसिद्ध झालेल्या ‘कीचका’वरचा हा अखेरचा पडदा!**




अनु. प्रा. श्री. र. भिडे

*कीचक आणि बल्लवाची घनघोर कुस्ती सुरू झाली. अनेक प्रकारचे डावपेच दोघंही खेळू लागले. गुद्द्यावरचे गुद्दे एक-मेक मोठ्या कौशल्यानं चुकवू-मुकवू लागले. सैरंध्री तर बल्लवालाच अधिकाधिक उत्तेजन देऊ लागली. पण शेवटी सैरंध्री नि बल्लव कोण होते?*

**कीचक**: पुन्हा आम्ही म्हणतोस...आम्ही कोण ?

**बल्लव**: (सैरंध्रीकडे पहात) सांगीतलं नाही का ही आणि मी म्हणून......

**कीचक** : ही. .ही कोण ?

**बल्लव** : हे तुला आता ठाऊक झालंच असेल...

**कीचक** : (सैरंध्रीकडे पहात)..तुझी बायको ?

**बल्लव** : होय. . तीच. .

**कीचक** : ही. . म्हणजे द्रौपदी...?

**बल्लव** : होय...

**कीचक** : मग तिनं मला तसं आधीच कां सांगितलं नाही. .

**बल्लव** : पुन्हा तेच. .मी मघाशी जे कारण सांगितलं तेच. .

**कीचक** : (पश्चातापाने). .मी इतका वेळ चुकतच आलो... मी जेव्हा हिला प्रथम पाहिलं तेव्हाच वास्तविक ओळखायला हवं होतं... द्रौपदीच्या स्वयंवराच्या वेळी मला अनुभव आला होता, तोच अनुभव ही दिसता क्षणीच मला याही वेळी आला होता... अरेरे! मी तुला फार वाईट वाईट बोललो. . .तुझा आचाऱ्याशी घाणेरडा संबंध आहे असं म्हटलं! पांचाली. . मला क्षमा कर. .मी किती मूर्ख. . तुल्यबल सहाध्यायाकडून मी जिंकलो गेलो हे केवढं माझं भाग्य ? पांचाली, तू तुझ्या संकटाची मला थोडी जरी कल्पना दिली असतीस तर मी भीमसेनाची बाजू घेऊन सुयोधनाशी लढलो असतो, नि पांडवांचं जे न्याय्य ते त्यांना मिळवून दिलं असतं.

**बल्लव** : तुला तसं करणं शक्य झालं नसतं !

**कीचक** : तू म्हणतोस तरी काय ?

**बल्लव** : तू सुयोधनाचा मांडलिक होतास हे विसरू नकोस. . तू राजासाठी, राज्यासाठी त्याच्या बाजूनं आमच्या विरुद्ध लढला असतास. आमच्या बाजूनं नाही...

**कीचक** : होय! तू म्हणतोस ते खरं आहे. ज्या पांचालीकरिता मी गेली पंचवीस वर्षे अविवाहित राहिलो तिच्या पतींविरुद्ध लढलो असतो. तिच्याविषयी माझ्या मनात असणाऱ्या आदराशी ... प्रीतीशी तसं वागणं सुसंगत झालं नसतं. . . मी स्वत:शीच प्रतारणा केली असती. .मला आता मरण येत आहे हे ठीकच आहे. शिवाय नेहमी सतत यशच मिळत गेल्यानं नि तुल्यबल अशा कोणीच माझ्याशी चांगली लढत न दिल्यानं माझं जीवन कंटाळवाणंच होत चाललं होतं हेही खरंच आहे... तुम्ही वेषांतर करून इथं आलात हे मजवर मोठे उपकार झालेत... माझ्या जीवनातली एक महत्वाची नि अंतीम इच्छा पुरविलीस... तुल्यबल वीराकडून मृत्यु यावा हीच माझी इच्छा. .त्यातून तू माझ्या परमपूज्य वंदनीय गुरूंचा तितकाच वंद्य शिष्य. .परंतु अजूनही तुम्हा दोघांविषयीच्या माझ्या स्मृति स्पष्ट झालेल्या नाहीत. तुमच्या वेषांतरीत अवस्थेत—इतर सर्व जागा सोडून तुम्ही, याच राज्याचा आश्रय कां घेतलात ?

**बल्लव** : मत्स्यदेशाची ख्याति ऐकूनच आम्ही येथे आलो... या राज्यातील प्रजा अत्यंत आतिथ्यशील असून स्वेच्छेप्रमाणं व्यवसाय पत्करून इथं अनिर्बंधपणे वाटेल तितके दिवस बिनधोकपणे राहता येतं असंही आमच्या कानावर आलं होतं. विराटाच्या शांतताप्रियतेची प्रशंसा उत्तरेतही केली जाते..... आम्हाला भीति वाटत होती ती फक्त तुझीच. .कारण तू आम्हाला चटकन् ओळखशील असं वाटत होतं... नि म्हणूनच तू या राज्याबाहेर गेलेला पाहून त्याच वेळी इथं येण्याची आम्ही घाई केली.... तू वर्षानुवर्षे मोहिमांवर जातोस, नि आम्ही आलो त्यावेळी तू नुकताच मोहिमेवर गेला होतास ... अशाच वेळी आम्ही येथे आलो.. नि प्रत्येकानं असा पेशा पत्करला की आम्हाला आमच्या







पूर्वीच्या स्वरूपाची ओळख सुद्धा राहू नये... आम्ही वेगवेगळ्या व्यवसायांचं शिक्षण घेतलं..आणि म्हणूनच मी पाकशाळेचा प्रमुख झालो नि ही सम्राज्ञीची मुख्य दासी बनली. हिला आपलं व्यक्तित्व लपवणं फारच जड जाईल...हे आम्हाला दिसत होतं.. परंतु आमचा नाईलाज होता.. हिच्याबाबत याहून काही वेगळं करणं—आम्हाला जमलं नसतं......

**कीचक** : पांचालीला इथं दास्यकर्म करावं लागावं अं ! तिनं जर माझी पति म्हणून निवड केली असती तर या राज्याची ती राणी-सम्राज्ञी-झाली असती... तिनं तुम्हा पाचजणाना स्वीकारलं.... नि तरीही तिची ही दुर्दशा व्हावी ना ! भीमा, हीची ही अवस्था पाहून मला फार दुःख होतं रे ! हिच्यासाठी जीव तुटतो रे ! (सैरंध्रीकडे केविलवाण्या रीतीनं पहातो) दुःखाच्या भारानं तू इतकी कां कालवंडलीस.. तुझे पति पाच......बरं, कायरे इतर चौघे कुठं आहेत ?

**बल्लव** : विराट महाराजांचे नवे सल्लागार कंकभट—म्हणजे धर्मराज.

**कीचक** : अरे, मी कालच त्याची धर्मराजाशी तुलना केली.. ती-किती सार्थ होती.....

**बल्लव** : नाट्याचार्य बृहन्नल — पार्थ...

**कीचक** : तो ? त्याच्याकडे नजर टाकताच त्याच्या पदविन्यासांनी धनुर्धर पार्थाची आठवण झालीच होती मला....बरं इतर....

**बल्लव** : नकुल आणि सहदेव — शस्त्रागार नि पागा, पशुसंगोपन यांची देखभाल करत असतात...

**कीचक** : तरीच...ताई मला म्हणालीच होती की नव्या माणसांची नेमणूक केल्यापासनं आपली पागा किती सतेज झाली आहे.... तुम्ही केवढ्या चातुर्यानं हे वेषांतर केलं !

**बल्लव** : आतापर्यंत तरी या साऱ्या गोष्टी चांगल्या जमल्या आहेत. वटवल्या आहेत. तू लवकर परतल्यानं मात्र आमच्या संकटाला प्रारंभ होऊन भीति वाटू लागली होती.

**कीचक** : मी तसं तुमचं काय वाईट केलं ?

**बल्लव** : तसं प्रत्यक्ष असं तू काही केलं नाहीस हे खरं.... परंतु आमची अशी पक्की खात्री होती की तू—नाट्याचार्य—या राज्यात परत आलास की आम्ही खात्रीनं ओळखले जाणार..... तू स्वतः नाट्याचार्य असल्यानं तुझ्या गरुडदृष्टीतून वेषांतरामागं दडलेलं आमचं मूळ स्वरूप तुझ्या सहज लक्षात येणार अशी आम्हाला सारखी धास्ती वाटत होती....

**कीचक** : तुला वाटतं त्याप्रमाणं मी तुमच्या वेषांतराबाबत काहीच केलं नाही.. तुला केलं असं वाटतं ?

**बल्लव** : नाही... तसं नाही वाटत...पण आम्हाला आपली कां कोण जाणे भीति वाटायची ! दैवानं तुझ्या नि आमच्या भोवती जाळं विणून ठेवल्यानं तुझी ही दुर्दशा झाली आहे... तुझ्या अनुपस्थितीत इथं येऊन तुमच्या आतिथ्याचा स्वीकार करून जमेल तेवढ या राज्याचं-तुझ्या भूमीचं कल्याण करावं हा आमचा खरा उद्देश... नि इथं येऊन मी सांप्रत केलं काय ? तर तुला ठार मारत आहे.. मला मनस्वी दुःख होत आहे.....कीचका, तु‍ जिवंत करण्याची विद्या जर मला अवगत असती तर मी तुला या अवस्थेत फार वेळ ठेवलं नसतं.... तुझं आमच्याबद्दल असणा‍ प्रेम— त्याची थोडीशी चुणुक जरी मला आधी कळती तर हा मृत्यूची पकड मी तुझ्याभोवती निश्चित आवळली नसती. आपल्या आयुष्याच्या अंतकाळीच आपणाला एकमेकाच्या हृदयाची ओळख पटावी.. वस्तुस्थितीचं ज्ञान व्हावं....याहून अधिक दुर्दैव ते कोणते ? एकमेकाची ओळख पटावी म्हणूनच आपण लढलो....नि आप‍ मृत्युमुखी जात आहो.... उशीरा का होईना परंतु इतर सर्वांच्या आधी आपणाला एकमेकाचं प्रेम कळलं... तुझ्या भोवती यमपा‍ आवळले जात असताना आता या पश्चात्तापाचा तरी काय उपयो‍ आहे ? (बल्लव भावनाविवश होतो. त्याच्या नेत्रातून अ‍ ओघळतात... कीचकाचा हात तो आवेगानं धरतो, कीचक आ‍ स्वरात ओरडतो) अरेरे..... काय दुष्ट मी...मी तुझा हात दाब‍ तो तुला त्रास व्हावा म्हणून नाही... मी तुला बिलकूल दुख‍ इच्छित नाही... दिला आहे तोच त्रास वाजवीपेक्षा जास्त आहे. तुझ्या मैत्रीची नि अंतःकरणाची नव्यानं ओळख पटल‍ म्हणून मी तुझा हात प्रीतीनं दाबला... परंतु, दुर्दैवा ! फा‍ उशीरा जाग आली रे !

**कीचक** : (अस्पष्ट हास्य) तू मला जवळ जवळ ठारच के‍ आहेस नि वर मलाच दुःख होत आहे का म्हणून विचारतोस ?. ते काही का असेना.. तुझ्या हातानं मरण येणं ही एक भाग्याच‍ गोष्ट आहे..आणि तेही तुम्ही लवकरच या वेषांतरीत स्थितीतू‍ अज्ञातवासातून — मुक्त होऊन सुयोधनाशी लढून आपलं न्याय‍ हक्काचं असं राज्य परत घेणार आहात हे कळल्यानंतर तर..... मला आत्ताच ठार करीत आहेस हेही एका दृष्टीनं चांगलंच हो‍ आहे, कारण तुम्ही विजय संपादन करेपर्यंत द्रौपदीचे होणारे हा‍ मला पहावले नसते....

**बल्लव** : आमचा विजय निश्चित असल्यानं तिला आम्‍ आता कोणत्याही क्षणी सुखी करू.... आणखी फक्त एक पंधरावड‍ जाऊ दे.. मग धार्तराष्ट्रांना समजणाऱ्या अशा एकाच भाषे‍ ...म्हणजे शस्त्राने...सैन्याची रचना करून आम्ही आमची न्याय्य मागणी पुरवून घेऊ....

**कीचक** : त्याप्रसंगी तुम्ही माझ्या या अफाट सैन्याचं‍ सहाय्य घेतलं पाहिजे... होय, तुम्ही ते घ्यायलाच हवं.. (दूर नजर टाकून) परंतु यावेळी मी मात्र नसणार... विजय संपादन करणाऱ्या सैन्याची रचना गेली पंचवीस वर्षं मी करीत आलो आहे.... म‍ नसणार ! केवढी शोकांतिका आहे ही !

**बल्लव** : कीचका, सेनाधिपतीला ठार करण्याचं पाप क‍ णाऱ्या मला तुझ्या सैन्याच्या सहाय्याचं पुण्य मिळू शकणा‍ नाही.... मला ते घेता येणार नाही...

**कीचक** : परंतु माझ्या सैन्याच्या पाठिंब्याशिवाय तुला यशही कदापि मिळवता येणार नाही... तुम्ही स्वतःची आणि या पांचालीची काय दैना करून घेतली आहे. थोडा थांब... मजजवळ आहे... माझ्या हाताखालच्या अधिकाऱ्याला—दुय्यम सेनापतीला बोलाव.... मी तुला द्यायला सांगतो . . .

**बल्लव** : म्हणजे आम्ही कोण हे इतराना कळलं तर... नि ते कळणारच.. आम्हाला पुन्हा बारा वर्षं वनवास नि एक वर्ष अज्ञातवास भोगायला लावणार आहेस तू.... नाही.... तुला असं करू देणार नाही... माझा स्पष्ट नकार आहे... एकदा नव्हे शंभरदा—हजारदा....

**कीचक** : तुझं म्हणणं बरोबर आहे...पण थांब . . . मला अमळ विचार करू दे. . . तुला मदत करता येईल असा एखादा उपाय सापडेल . . . निदान हिच्याकरिता तरी . . . हिला मी सहाय्य केलंच पाहिजे. मरणोन्मुख कीचक एरवीप्रमाणंच नि एरवीइतकीच मदत करू शकतो हे मी तुला दाखवून देतो . . . माझी एक विनंती ऐक.... माझी ताई नि सम्राट विराट महाराज याना इथं आत्ताच्या आत्ता बोलाव... हिलाच धाड.

**बल्लव** : ही तर त्याहून अधिक मूर्खपणाची योजना ! मला वाटतं... तुझ्या मनावर तुझा आता ताबा उरलेला दिसत नाही.....तुझं मन कुठं तरी भलतीकडंच भरकटत आहे. . .

**कीचक** : (अधीरपणे) मूर्खासारखं बडबडू नकोस ! माझा अंतकाळ झपाट्यानं जवळ येत चालला आहे. ज्या पांचालीवर तुम्ही पाचीजण प्रेम करता तिचं भलं करण्याकरता तरी मला काही तुमचं चांगलं करायलाच हवं ! त्याना तू ताबडतोब बोलावून घे ! तू त्यांच्यावर विश्वास ठेव... (डोळ्याने खुणावून)... माझं, निदान एकदा तरी ऐक...मी तुझी प्रार्थना करतो...(सैरंध्रीकडे पहात) हिला वांचविण्याकरिताच तू मला ठार केलं आहेस... तसंच मी सांगतो ते तिला वांचवण्याकरता तिच्या कल्याणासाठीच कर... (भावनावश होऊन) मी सुद्धा हिच्यावर नितांत प्रेम करत आलो आहे...नि हे तुला ठाऊक आहे... वृकोदरा ! केवळ हिच्याच करता, भीमा तू माझी ही शेवटची इच्छा मान्य केलीच पाहिजेस... (बल्लवाच्या मनावर त्याच्या बोलण्याचा विलक्षण परिणाम होतो. तो सैरंध्रीला खूण करून सुदेष्णा नि विराट याना बोलवायला सांगतो. सैरंध्री जाते. ते येईपर्यंत बल्लव कीचकाला धीर देतो.)

**बल्लव** : कीचका, तुझे हे उपकार, माझ्यासारख्या कृतघ्नावर केलेले उपकार, मी कसे फेडू... तुला ठार करण्यात माझ्या हातून फार मोठा अविचारीपणा झाला आहे. . . माझ्या मूर्खपणाबद्दल मला आता पश्चाताप होतो आहे. मित्रा, चुकलं रे माझं...

**कीचक** : वृकोदरा, मी हे सारं तुझ्याकरता, तुझ्या भावांकरता करत नसून केवळ तिच्याकरता—तुमच्या जन्मजात अविचारीपणामुळं जिला सतत दुःख सहन करावं लागलं—तिच्या मागचा वनवास टाळावा—म्हणून करत आहे. तुम्ही तिचे पति असला तरी तिच्या प्रीतीला लायक नाही. . . काय तुम्ही तिची दुर्दशा केलीत...!

**बल्लव** : कीचका, तुझं म्हणणं खरं आहे... आम्ही तिला लायक नव्हतो... नाही... परंतु परमेश्वर साक्ष शपथ घेऊन सांगतो: आजपर्यंत तिच्याबाबत आम्ही कितीही दुर्लक्ष केलं असलं, तिची हेळसांड केली असली तरी इतःपर तिचा मान योग्य रीतीनं ठेवू... तिच्याविषयीच्या आदरात विलकूल अंतर पडू देणार नाही...ती खरोखरच पूज्य आहे...

**कीचक** : (किंचित् कष्टाने आर्जव करून) मी सुद्धा नेमकं हेच करू इच्छित होतो...परंतु आता.... या जन्मी तरी ते शक्य नाही.... वृकोदरा, तुझ्या शब्दांवर मी विश्वास ठेवू ? यापुढं तरी तिला कोणत्याच प्रकारचे दुःख भोगावे लागू नये.... तू तिला सुखी करशील - ठेवशील - असं वचन देतोस मला ?

**बल्लव** : मी कुणाची शपथ घेऊन सांगू ? यापुढे मी तिला कसलाच त्रास होऊ देणार नाही - तू निश्चिंत रहा. . . .

**कीचक** : आता ह्या कुडीबाहेर पडणाऱ्या माझ्या आत्म्याला निश्चितपणे शांति लाभेल. तुझ्या या आश्वासनानं मी आता सुखानं मरेन !

**बल्लव** : परंतु तुला इतक्यातच प्राण सोडता येणार नाही... सम्राज्ञी सुदेष्णा नि सम्राट विराट महाराज अद्याप इथं आलेले नाहीत.

**कीचक** : ते येईपर्यंत मी मोठ्या कष्ठानं प्राणधारणा करू शकेन...त्यांनाही मार्गदर्शन करायलाच हवं..राहतो मी कसातरी.. घाबरू नकोस. . . . .

[ याचवेळी सुदेष्णा नि विराट सैरंध्रीसह घाईघाईने प्रवेश करतात. कीचकाला पाहताच त्यांच्या मनाला विलक्षण धक्का बसतो, त्यांच्या डोळ्यातून अश्रु ओघळू लागतात. ]

**सुदेष्णा-विराट**: (रडत रडत) काय झालं हे? अशा रीतीनं तुझा अंत व्हावा? एवढ्याचसाठी का तू स्वारीवरून परत आलास?

**कीचक**: (डोळ्याने खूण करून तो त्याना शोक आवरण्यास सांगतो) ताई...भीमसेन नि पांचाली तुला सारं काही विस्तारानं सांगतीलच . . .











**सुदेष्णा :** भीमसेन नि पांचाली? कुठं आहेत ती?

**कीचक:** इथं—तुझ्या समोरच..पण आता वेळ दवडू नकोस.. उत्तरेसाठी अभिमन्यूचा शोध करण्याचं मी ठरवलं होतं, लक्षात आहे ना! मी त्याचा शोध लावला आहे नि त्याचं पारितोषिकही मला मिळालं आहे... कोणतीही गोष्ट एकदा करावयाची ठरलं की प्राणाची सुद्धा पर्वा करत नाही हे तुला ठाऊकच आहे...हा भीमसेन आणि ही द्रौपदी—इथंच आहेत... कंकभट हाच धर्मराज असून नवे नाट्याचार्य बृहन्नल म्हणजे पार्थ. नकूल नि सहदेवही तुमच्या शस्त्रागारांची नि पागांची व्यवस्था पहात इथंच आहेत. आणखी पंधरा—वीस दिवस त्या सर्वांना ह्या वेषांतरीत अवस्थेत इथंच रहायचं आहे...हा अज्ञातवासाचा काल ते इथंच घालवू इच्छितात....त्यांची योग्य ती काळजी घ्या.....त्यांना नीट संरक्षण द्या. त्यांच्या भाऊबंदाबरोबर...धार्तराष्ट्रांबरोबर....पुढं जो त्याना लढा द्यावा लागणार आहे, त्यावेळी तुम्ही तुमच्या सर्व सैन्यासह त्याना सहाय्य करा.... त्यांच्या अज्ञातवासाची मुदत संपताच अभिमन्यूचा शोध करून उत्तरेचा त्याच्याशी विवाह करा... नि तसं केलं म्हणजे पांडवाना मदत करण्यास तुम्हाला कारणही मिळेल....ताई, मला वचन दे...

**सुदेष्णा:** दादा, तू असं निर्वाणीचं कां बोलतोस? तुला कोणी मारलं? तुझी ही अशी अवस्था कोणी केली? सांग...

**बल्लव:** (स्वतःचा धिक्कार करीत)...मी..मी..दोषी आहे..माझ्या अविचारीपणामुळं हे असं झालं.....क्षमा करा मला...यानं उठावं नि मला शासन करावं...माझ्या अविचारी कृत्याबद्दल जबर शिक्षा करावी...

[सुदेष्णा लालबुंद डोळ्यांनी भीमावर जणू अग्निवर्षाव करते परंतु कीचक आपल्या दृष्टीने तिला परावृत्त करतो.]

**कीचक:** (करडेपणाने) ताई, त्याला कां दोष देतेस? त्याला कोणीही दोष देता कामा नये! मीच त्याला कुस्तीसाठी आवाहन केलं—आव्हान दिलं.....इतकंच नव्हे तर त्याला मीच फूस दिली..अशा रीतीनं लढता लढता मरावं हीच माझी इच्छा होती हे तुम्हाला ठाऊकच आहे. त्यानं जे केलं ते योग्यच आहे...झालं ते झालं...गतं न शोच्यं...पुढच्याचा विचार करा..माझी इच्छा तृप्त झाली आहे...माझ्या मृत्यूनं पांचालीचं सारं आयुष्य सुखी होणार...मला तरी याहून अधिक काय हवं होतं?..ऐक.. बस....तुम्हा सर्वांना...मी जे...सांगतो...तसं वागा... मला वचन दे.....!

**सुदेष्णा-विराट:** तू या क्षणी आहेस...नि पुढच्या क्षणी... नको तो विचार....तुझा हा असा अंत पाहून.....

**कीचक:** ताई—महाराज....मोहिमांतून आपण कित्येक जीवांचा संहार करत आलो नाही काय? जे गेले—मेले—त्यांच्या-साठी रडलो आपण?....नाही ना. मग तुमचा एक आप्त मृत्युमुखी पडला आहे म्हणून अश्रु ढाळता?....एक ना एक दिवस प्रत्येकाला जायचंच आहे....जायलाच हवं...लढत गेलं पाहिजे...माणसानं दुसऱ्याच्या कल्याणासाठीच जगलं पाहिजे मेलंही पाहिजे...मी हेच केलं...पुसा ते डोळे...माझ्या जवळ या....मला तुमचा शेवटचा निरोप घेऊ दे.. जवळ...

[सर्वजण त्याच्याजवळ गोळा होतात. आपले कान त्या तोंडाजवळ नेतात. तो शब्दोच्चार मोठ्या कष्टाने करतो]..

आता गेल्यातच जमा...लवकरच मी जाणार...माझ्या मृ विषयी तुम्ही कुणाला काही सांगू नका....कुणालाही मदत सुद्धा बोलावू नका....माझा मृत देह कीचक-वनात गुप्त न्या....तुम्ही चौघेच...फक्त चौघच जण जा...क कीचक गोळा करूनच माझी चिता रचा...त्यावर माझं ठेऊन त्याला अग्नी द्या....म्हणजे या कीचकाच्या देहाबरोब सारं कीचक वन जळून जाईल.....तुम्ही शांतरीतीनं वाड परत या...नि उद्या...शिकारीच्या नादानं बेफाम झाले कीचक. काल रात्री जंगलात गेला असता...अनवधानतेनं वणव सापडला असं सांगा. या दिवसात जंगलात वणवा नेहमीच उ त्यानं कुणालाच संशयही येणार नाही...नि नंतर...थोड्य दिवसात यांचा अज्ञातवास संपेल.....उत्तरेचा विवाह श तितक्या लवकर उरकून घ्या. नि बाळ अभिमन्यूला स्वतः नि द्रौपदीच्या सुखासाठी लढताना सर्वतोपरी सहाय्य करा. म्हणजे ही पांचाली सुखी होईल! तिचं उरलेलं आयुष्य सु समाधानात जायला हवं! मला वचन दे...! प्रत्येकजण व द्या! मी तुमची याचना करतो.....मी जिच्यावर मनापा प्रेम करत आलो तिच्यासाठी....वचन!

**सर्वजण:** (एका आवाजात...परंतु रडवेपणाने) हो आम्ही दिलं वचन!

**सुदेष्णा:** परंतु दादा, हे दिलेलं वचन पूर्ण झालेलं पाहण्य तू नाही का राहणार?

**कीचक:** नाही...ताई....शक्य नाही...माझी जीव तली एकमेव इच्छा आज तृप्त झाली...ज्या रीतीनं मला म यावा असं वाटत होतं...ज्या करता मी तळमळत होतो..तसा म मृत्यु लाभला..माझ्या ओठातून पां—चा—ली ही अक्षरं बाहेर प पडता मला मृत्यु यावा हे केवढं माझं भाग्य! तिच्यासाठीच मरत आहे...ही कल्पनाच किती समाधानाची आहे...अ वृकोदरा!

**बल्लव:** (हळुवारपणे) दादा—काऽय?

**कीचक:** (लहान मुलाप्रमाणे) माझी तू एखादी इच्छा करशील?

**बल्लव:** हे विचारायची आवश्यकता नाही! सांग...तु मुखातून उच्चार होण्यापूर्वीच मी ती पूर्ण करेन! बोल....

**कीचक:** (अत्यंत निष्कपटतेने) तुझी ही मिठी...अ घट्ट कर.....

**बल्लव:** (ऐकून धक्का बसतो) काय म्हणतोस? एवढं न






सांगूस? आता तुला ठार करू. . .मला तू समजतोस तरी कोण? कृतघ्न. . .खुनी. . .

**कीचकः** (भेसूर हास्य) बल्लवा तू मला आधीच ठार केलं आहेस. . . .विसरू नकोस. . . .माझा प्राण मी आतापर्यंत कसा तरी धरून ठेवला. . .आता माझ्या इच्छेप्रमाणं मला सुखानं मरू दे. .माझी इच्छा नाही पुरवणार?

**बल्लवः** ही एवढी गोष्ट सोडून तू दुसरं काही सांग. . .

**कीचकः** ठीक आहे..तुझी इच्छा. नको पुरवूस माझी शेवटची इच्छा. . .निदान मला तुझ्या बाहूत तरी घेतोस...नि मग मला कवटाळ. . .खूप कवटाळ. . .अगदी भुगा कर....(बल्लव मोठ्या अनिच्छेने त्याला बाहूत घेतो.) जरा आणखी जोरात आवळ. . थोडं आणखी. . .लोखंड आणि दगडाच्या राशीचा भुगा करणारे हेच का ते भीमसेनाचे बाहू? कदाचित् एखाद्या स्त्रीला. . .स्वतःच्या पत्नीलाच–बाहूत घेतलं आहेस असं कां समजतोस? नाही..ना. मग जोर कर की. . .तुझ्या बाहूत कीचक आहे..तुझा एकवेळचा सहाध्यायी. पां चा. . .नव्हे. . .की च क . . .विसर पडू देऊ नकोस. . .जोरात. . .आणखी जो रा त. . . .

**बल्लवः** कीचका, असं करण्यापूर्वी जर मला मरण येईल तर बरं!

**कीचकः** तू. . .मरणार. . .वेडा तर नाहीस ना! पांचालीला सुखी करण्याचं वचन तू मला आत्ताच दिलं आहेस. .विसरलास वाटतं? भीमा, तुझं मन कुठं भरकटत आहे...भल्या माणसा, मन शांत ठेव...आता तू बल्लव उरला नाहीस...तू आता पुन्हा भीम झाला आहेस—ही आठवण मी कां तुला करून द्यायला हवी. . .?

**बल्लवः** दादा, मेलेल्याला अधिक कां मारतोस...क्षमा कर मला...मी भीम आहे. याची आठवण तू मला एकदा नव्हे हजार वेळा करून दे. . .(गोंधळून) काय बोलावं हेच मला सुचत नाही...मला कधीच चांगलं बोलता येत नाही....तुला ठाऊक आहे.. मी फक्त चांगला. . . .

**कीचकः** कशात?

**बल्लवः** ठीक. . .करताना. . . .

**कीचकः** छान. .मग आता बोलू नकोस. .फक्त कृति कर...

**बल्लवः** सांग. . .मी काय करू सांग?

**कीचकः** दुसरं काय? मला एकदम घट्ट आवळ. . .तुझी पकड घट्ट करून मला परलोकी धाड. . . .चल, आटप. . . .

**बल्लवः** (असहाय्यपणे यंत्रासारखा सर्वत्र बघतो...कीचकाला एकदम घट्ट आवळतो..आपल्या डाव्या हाताने आपले डोळे झाकून घेऊन त्याच्या कलत्या देहाला घट्ट आवळतो. . .) . .ठीक आहे ना!

**कीचकः** (आनंदाने) ही. . .ही तुझी मृत्यूची मिठी. .फारच छान. . .आता मला सुखानं मरण येईल. ताई, सम्राट, भीमा, पां चा ली—माझे अखेरचे शब्द नीट लक्षात धरा. . .माझा हा देह. . . .त्यात प्राण असताना प्रीतीच्या ज्वाळांनी. . .अग्नीच्या मुलीच्या प्रीतीला. . .अर्पण केला होता. . .आता तोच अग्निज्वाळांना अर्पण करा...

[एवढे बोलून कीचक ओठावर हास्य ठेवून मरून पडतो. सुदेष्णा, सैरंध्री विलक्षण आक्रोश करू लागतात. विराट आणि भीम विलक्षण शोकमग्न होतात. भीम एकाएकी भानावर येऊन घोगऱ्या आवाजात म्हणतो.]

**बल्लवः** त्याच्या इच्छेप्रमाणंच त्याचा अग्निसंस्कार करायला हवा. (दीर्घ सुस्कारा सोडून) बलाढ्य कीचक—मृत होऊन पडला आहे. . . .बिचाऱ्यासाठी फारसा कुणी अश्रु न ढाळता. .शोक, आक्रोश न करता. . . . .

**सुदेष्णाः** (हळूच उठते. मन आवरते आणि अभिमानाने) वृकोदरा! असं म्हणू नकोस. . .हे पहा पांचाली नि आपण सारे रडत आहोत. . .या भूमीचे राजे नि राण्या असे जे आपण ते रडत आहोत. . . .याहून अधिक काय हवे? त्याच्यासाठी कुणीच रडलं नाही असं कसं म्हणता येईल...ज्यांनी त्याच्यावर मनापासून प्रेम केलं त्या राजांनी—राण्यांनी शेवटपर्यंत अश्रुसिंचन करावं.. याहून अधिक सन्मान तो काय असेल? यापुढं युगानुयुगे कीचकाच्या प्रीतीची कथा गाईली जाईल....माझ्या दादाला वीराचं मरण लाभलं. त्याच्या इच्छेप्रमाणं त्याचे अग्निसंस्कार करण्यासाठी जंगलाकडे चला. . .आपण वचनबद्ध आहोत. . .आपलं कर्तव्य—कितीही कटु असलं तरी पार पाडायलाच हवं. . .चला. . .

[सर्वजण कीचकाजवळ येताच पडदा झटकन् पडतो.]

**[समाप्त]**

---

[पृष्ठ ४२ वरून—हृदयपरिवर्तन]

त्याच बरोबर एक नैतिक प्रश्नही पुढे उभा राहातो. हा प्रश्न ज्याचे हृदय बदलले जाणार आहे त्याच्या बद्दलचा आहे.

हृदयाचे कार्य नीट नाही ते अगदी मोडकळीस आले आहे अशाच अवस्थेत रोगी डॉक्टरकडे येतो. डॉक्टर त्याचे हृदय काढून घेतो म्हणजे त्याला 'मारतोच' ना! बरं नवे हृदय तरी कायम राहील ह्याची काय खात्री? म्हणजे हा हृदय बदललेला माणूस शेवटी मृत्युमुखीच पडतो. त्याचाच अर्थ डॉक्टरने त्या रोग्याला मारले, असा होत नाही का?

वरील सर्व प्रश्नांवर एक तोडगा आहे. आणि तो म्हणजे कृत्रिम हृदय. निकामी हृदय काढून टाकून त्या जागी कृत्रिम हृदय बसविले तर हे प्रश्न उरतच नाहीत. काही तज्ञ शल्यवैद्यांच्या मते जिवंत हृदयाची अदलाबदल करण्यापेक्षा यांत्रिक हृदयानेच ते निकामी हृदय बदलावे.

प्रश्न असोत अगर नसोत, एक विलक्षण व अलौकिक शस्त्रक्रिया माणसाने करून दाखविली आहे. त्या शस्त्रक्रियेमुळे त्याच्या प्रगतीत भरच पडली आहे. भविष्यात कृत्रिम हृदयही तयार होऊ शकेल. मग मात्र कोणालाही आपले हृदयपरिवर्तन करता येईल. ●



# देवाची शेंडी

--वामन इंगळे

## एक वऱ्हाडी कथा

**रवीचे** दोर खांबाला बांधून देऊन सकवार; अजून किती रात्र बाकी आहे हे पाहण्यासाठी अंगणात आली. नेहमीच्या रिवाजाप्रमाणे तिची नजर आकाशात तेवत असलेल्या शुक्राच्या ताऱ्यावर पडली. ती स्वत:शीच पुटपुटली,

'अई लेक; माही रई लाऊन झाली तरी अजून लय रात बाकी आहे. जम्मेत सुकीर निंघाला.'

सकवार गेल्या पाऊलीच पुन्हा घुसळणाच्या मडक्याजवळ आली. लोण्याच्या गोळचावर कवडी विवा थापून तिने सतलीचे तोंड एरंडीच्या पानाने गुंडाळले. मोठ्या मडक्यातील ताकाच्या पाण्यात तिने शेवटचा हात फिरवून ताकाची व लोण्याची दुतली शिंक्यावर ठेऊन दिली. आजुबाजूला सर्व सामसूम होते. गोठ्यातील गाईच्या रोहक्याचा करकर असा आवाज. मध्येच रांधणीत झोपलेल्या मुलांची झोपेतील कुसमूस. एवढे ऐकू येत होते. बाकी सारे गडीगुप्प.

घुसळण आटोपलं आहे. आता आपण आरामात पान तमाखु करायला काही हरकत नाही म्हणून तिने कमरेची चंचई काढून जमिनीवर बसकण घेतली. इतक्यात दाठ्ठ्याच्या दरवाजाच्या साखळीत आवाज आला म्हणून तिने त्या दिशेने कान टवकारले.

''आवो, ये सकवार, दरोजा उघडजो.''

''अई माय ह्यातं भीमाबुढीचा आवाज व्हय. रांडीनं काय रातभर जागृती केली मनाव काय लेक?''

असे पुटपुटत सकवार दरवाजा उघडण्यासाठी धावली. दाठ्ठ्यात भीमाबुढी उभी होती. पहाटेच्या अर्ध्यामुर्ध्या उजेडात तिची वलसावली मातीच्या उंबऱ्यावर पडली होती. तिच्या हातात रिकामे



घरात पाळणा हलावा म्हणून भीमाबुद्धीनं नवसाचा प्रस[illegible] मुलाला [illegible] सूनेला दिला. गोविंदानं तो पटकन् खाल्ला अन् पंचपुलानं तो [illegible] फेकून दिला. प्रसाद खाऊन मुलं झाली तर जग किती सुखी होईल नाही!

टमरेल होते. टमरेलावर नजर पडताच सकवार लगबगीने बोलली,

"दादीबाई; एवढ्या पाहाटी मैदाना-कूनवी जाऊन आल्या काजी वापा बाई?"

"काय करू तं. बुन्हारी जपच नाही आली. आता आमा म्हताऱ्यायले कायची व जप?" भीमाबुढी नाखुषीने बोलली.

"जिवाले बरं नसन तं पांघरून घिऊन झोपून राहाव."

"पिशी आहे. मले कायचा रोग झाला गे? थो देव त विचारा आमच्यासाठी लपून बसला. कोंते कोंते सोंग दाखवाचे त्याच्या मनात आहे कोनाले मालूम?"

भीमाबुढीच्या सुरातील वैताग पाहून सकवार मनात काय समजाचं ते समजली. पण ती काहीच बोलली नाही. तोपर्यंत भीमाबुढी पन्हाटयांचा कडा लावलेल्या न्हाणीत गेली. हातापायावर पाणी घेऊन तिने तोंडाच्या बोळक्यातून बोट फिरविले. तोंड धुऊन छायवानीत येता येता ती बोलली,

"तुह्या रईचा अगाज आला. तुनं मडक्याखाली इस्तो केला असशीन त बसावं म्हनलं थोडीसं तपत."

"खिडभर बसा दादीबाई. मी घांडे आनून जाळ करतो."

सकवार फुर्ताईने बोलली. तिच्या तशा गुळचट बोलण्यामुळे सुखाऊन भीमाबुढी म्हणाली,

"पाह्य बरं; तुले तरी केवढी आंगोन आहे. सुकीर निघाच्या आंधीच शामीच रई दुभतं होऊन तय्यार. नाही तं माह्या इथचं सुनगट पाह्य. पसरली असल बेचारी पाय पसरून. आता इकडून जाऊन मडक्याखाली इस्तोभी मलेच पेटवा लागन. मले पाहा न फुलं वाहा. जरासं मनलं बोललं का फुगाराभी मोठ्ठा."

भीमाबुढीच्या मनात असंच काहीतरी रात्रभर सुलगत असावे हे सकवारने ओळखले. कंडी उलविण्याच्या उद्देशाने तिने खडा टाकला,

"काऊन वो दादीबाई, पंचेफुला तुमाले काई बोल्ली गिल्ली त नाही?"

"काय पुसतं माय सकवार. काही मना बोलाची भी चोरी झाली. असं आमच्या राजात नव्हतं बापा पाह्यलं."

भीमाबुढी थरथरत्या पायांनी मडक्याच्या चुलीजवळ येऊन बसली. अंगावर पांघरलेल्या लुगड्याच्या पडदूनीतून तिने दोन्ही हात बाहेर काढले आणि शेकण्यासाठी धांडयांच्या जाळावर धरले. सकवारने विस्तवाच्या प्रकाशात बुढीचा चेहरा न्याहाळला. बुढीला रात्रभर झोप न आल्यामुळे तिचा सुरकुतला चेहरा ओढल्यासारखा दिसत होता. तिचे लाल डोळे पाहून खेटगी रात्रभर रडली असावी असा सकवारला संशय आला. तिने आपुलकीच्या सुरात विचारले,

"काऊन वो दादीबाई....पंचेफुलानं काही झगडा भांडन केलं का वो?"

"अजकालच्या सूनमाह्यऱ्या भांडन नाही करत. त्याहीले आपल्यासारखं भांडाले जोर कुठीसा देल्ला देवानं. थ्या काटेरी दोडक्यावानी फुगतेत अनखीन सासवायचा कलीजा जाळतेत."

"आवो पन काई सपष्ट सांगाव का नी दादीबाई"?

"काय सांगू सकवार. कर्माचे गोटे. एकेक हिर्दयात येते आन् जाते."

भीमाबुढीच्या डोळयाना अचानक धारा लागलेल्या पाहून सकवार कमनुणी होत बोलली,

"तशा लडू नका माय दादीबाई रामपाह्यराच्या येळी. काही तोंडानं सांगा. झाली असन पोरीबायीकडून एखोंदी चूक. पानी पडाचं आहे अजून तिच्या आंगावर."

"कायचं पानी न कायचं काय म्हंतस माय सकवार. हल्यानं रांधल न म्हशीनं खाल्ल तसी खिसा आहे."

भीमाबुढीने मध्येच आवंढा गिळून गळा खाकरला आणि नव्या दमाने सांगायला सुरुवात केली,

"आवो, मिया काल तांब्या बड्डावरच्या मारुतीले हात जोडले. त्याले मनलं, बापा माह्या घरी पायना हालू देशीन त लेक अनखीन सूनले जोड्याधांड्यानं तुह्या



**ओम् फम् !**

कातर–वेळेला सांपडली नाही
म्हणून मी तसेच कापले तिला
कातरवेळेला डोळयात पाणी आणून
ती म्हणाली सगळा घोटाळा झाला

**विजारीकडून-विजारीकडे**

एका कविची हरवली विजार
सकाळपासून तो झाला बेजार
सारा बाजार त्याने धुंडला
साऱ्यातून तिरकस आशय शोधला
सांपडली नाही त्याला त्याची विजार
अजून आहे तो 'तस्साच' बेजार

–प्रकाश कामतीकर

**आम्ही कोण ?**

आम्ही भाषांतरे करतो
म्हणुन आमच्यावर उगीचच राग!
आम्ही 'पोटे जाळतो' आमची
लोकांच्या अंगाची उगीचच आग!!

**एक वात्रटिका !**

माकडा माकडा हूप.....
तुझ्या शेंडीला 'किलोभर' तूप!
माकडा...तुपाचे भाव वाढले
मी (आणखी) कर्ज काढले!!
माकडा माकडा हूप....
घरात पोरे वाढली खूप!
दोस्ता, यंदा म्हणतो
'घरात' बसवून घ्यावे लूप

–सदाशिव करंदीकर

पाया लागाले आनीन. पन्नास मानसं तुज्या पायरीवर जिऊ घालीन. म्या नरळ फोडलं. थे रांडलेक नारळ कसं वो खऊट निघलं. पर्सादाचा एक कुटका माज्या गोंईदाच्या हातावर ठिवला. त्यानं लहान लेकरावानी मटकन खाऊन टाकला. दुसरा कुटका थ्या पंचफुला का ढंचफुल्लाच्या हातावर ठिवला. तिनं कसा वो थो झरकन्या घरावर फेकून देल्ला."

भीमाबुढीने पुन्हा डोळ्याला पदर लावला. तशी सकवार अचंब्याने बोलली,

"ह्या तं माय चित्तरकथाच झाला. पन खोवरं नवसाचं आहे हे तिले सांगाचं काम नव्हतं ?"

"मी का एवढी पागल असन मनाव काय लेक? मिया थे त पह्यल्या सुट्टनांच सांगितलं. पन म्हंते कसी खऊट खोवरं खाल्ल त मले खोकला व्हीन. माह्या सोन्यासारख्या पोराले नाही व्हत खोकला अनखीन ह्या वाजानगरीलेच व्हाले बसला. केसं तितके मिसं. तू वरं म्हन का वाईट म्हन सकवार, पर म्या वाई खूप काहाडली दारीची सटक."

सकवार खुश होऊन बोलली,

"वरं झालं. अशाले असंच पाह्यजे. पन मंग दुसरा कुटका तरी खाल्ला का नी व तिनं?"

"आवो कुठचा माय. मिया सातच्या टाकल्या. रांधलं. गोंईदाले जेऊ घातलं. पन हे हूरन जाऊन पसरली त्या सायवानी-तल्या खाटल्यावर."

"पसरू द्याले पाहिजे होतं तिले तसंच कोरावत."

सकवार सुटकेचा श्वास टाकीत म्हणाली.

"आवो थे तसी खरं पसरूनच राह्यली. गोंईदाचं जेवनभी झालं. त्यानं पान तमाखुभी खाल्ला. खोलीत जाऊन सन्यानी झोपला अनखीन खिडभऱ्यानं घोराले भी लागला. तरीभी हे धुर्पता पसरूनच राह्यली. आता माज्या देखत गोंईदा तिले कसा बोलव? माहा पोरगं मानमय-रादाचं आहे."

"नाही उठली तं नाही उठली. राहू द्याले पाहिजे होतं तसंच कोरावत. तुमचं काय ताशी पानी जाते?"

"ताशी पानी जाचं नाही म्हनत गायमासे. इनं जाले नाही पायजे तिकडे?"

"तिकडे कुठीसा जी?"

सकवार वेड पांघरून बोलली. त्या-सरशी भीमाबुढी काताऊन म्हणाली,

"तू भी असी आहे सकवार. आवो बह्याडे, मी नवस बोलली आहे. हे धुर्पता असीच वन्हानी झोपन त थो मारोती तरी काय करन बेचारा?"

सकवारला हसण्याची गुळणी पचली नाही. ती तोंडात पदर खुपसून म्हणाली,

"तुज्या देवाची सेंडीभी पंचेफुलाच्याच हातात आहे मनाव काय लेक?"

भीमाबुढी काकुळतीला येऊन बोलली,

"तू हासतंस. पन माह्या जिवाले रातभऱ्यापासून घोर आहे बरं सकवार."

"तुम्ही अशा गयगयवान्यावानी नोका करूं दादीबाई. मी सांगीन पंचेफुलाले. थे आयकन माह्यावालं."

"सांगजो माय सकवार. म्हन सन्या-नीच झुंजरक तुझ्यापासी आली व्हती."

"सांगीनजी दादीबाई.......बसा मी चाहा मांडतो."

"आता चहागिहा घरीच पीन. माहा गोंईदा उठला असल. पन थे भुलजो नोको माझे–माय......त जाऊ मंग मी आता?"

"जा...पर वघूनं जाजा..."

भीमाबुढी थरथरत्या पायांनी जाण्यास निघाली. ती हळूहळू उंबऱ्याबाहेर गेली तरी सकवार तिच्या पाठमोऱ्या आकृती-कडे पुष्कळ वेळ टक लावून पाहात राहिली.

• • •

## ● भूकंपाची पूर्वसूचना देणारा अजब मासा

भूकंप ही एक नैसर्गिक आपत्ती आहे. ही आपत्ती येण्याचे भविष्य काही कुणी हमखास वर्तवीत नाही किंवा त्याबद्दल निश्चित अशी आगाऊ सूचनाही देता येत नाही. परंतु एका य:कश्चित माशाच्या सहाय्याने धरणीकंपाची अचूक अशी पूर्वसूचना मिळून सावध राहाता येते.

जपानमध्ये आढळणारा एक मासा आहे त्याचे नाव आहे 'पॅरासिल्यूरस असोटस्.' हा मासा मार्जारमत्स्य (कॅटफिश) या जातीच्या माशात गणला जातो. अशा जातीच्या माशांना त्यांच्या तोंडासभोवती मांजरासारख्या लांबच लांब टोकदार मिशा असतात. म्हणून त्यांना 'मांजर मासे' हे नाव मिळाले आहे.

या माशाचे वैशिष्टच असे की भूकंप होण्याच्या अगोदर १० ते १२ तास हा भावी आपत्तीची निश्चित सूचना देऊ शकतो. धरणीकंप होण्याच्या सुमारास जमिनीची होणारी हालचाल इतक्या अगोदर या माशाला इतक्या तीव्रतेने कशी काय जाणवते हे एक गूढ आहे.

एरवी मत्स्यालयात हा मासा सुस्त व मंद अशा अवस्थेत असतो परंतु भूकंप होणार आहे असे कळताच तो अस्थिर होऊन सैरावैरा आतल्या आत घिरट्या घालतो. तळ्यात व नदीत राहाणारे मासे तर यावेळी चलबिचल होऊन पळतच सुटतात. भूकंपाचा धक्का लहान असो वा मोठा असो तो निश्चित होणार आहे याची अशा प्रकारे जाणीव या माशाला कितीतरी अगोदर होते. हा अजब मासा इतका संवेदनशील आहे की आपल्या स्थानापासून जवळ जवळ-१५०० मैलाच्या घेरात भूकंप होण्यापूर्वीची भूमीची हालचाल तो अचूक ओळखू शकतो. जगात इतरत्र कुठेही या माशाइतका संवेदनशील व भूकंपाची पूर्वसूचना देऊन सावधगिरीचा इशारा देणारा मासा आढळलेला नाही.



अनुक्रमणिका




## जादुगिरीचा प्रयत्न

**भा.** द. खेरे यांच्या दहा कथांचा हा संग्रह आहे. भरपूर लेखन झाल्यामुळे आता त्यांच्या लेखणीला एकप्रकारे सफाई व सहजता येणे स्वाभाविक आहे. तिचा आढळ या त्यांच्या कथांमधून होतो. कथा वाचावयास घेतली की, ती अर्धवट सोडावीशी वाटत नाही, पण ती वाचून झाल्यावर तिचा ठसा कायमचा असा रहात नाही. काहीतरी 'गुंजन' झाल्यासारखे फक्त वाटते. **'गुंजन'** या संग्रहातील कथा वाचून वाचकाला हेच जाणवते.

कथेतील व्यक्तिमात्राचे वाचकाला आकर्षण रहात नाही, तर तिच्या रचना-कौशल्याचे वाटत राहते. सतारियाच्या कलेवर खूष होऊन अभावितपणे त्याच्या गळ्यात हात टाकणाऱ्या एका विवाहिते-वर आलेला प्रसंग चितारणारी 'दाद' ही पहिलीच कथा. अखेर मनात करून घेत-लेले भीतीचे घर कसे खोटे असते नायि-केचे,' हे समजून नायिकेपेक्षा वाचकच खट्टू होतो. मुलाची तळमळ लागलेल्या स्त्रीला तिचीच सासू शेजारणीच्या मुला-बाबत एक अघोरी उपाय सांगते, तेव्हा आपल्या पाळण्यासाठी दुसऱ्याचा पाळणा रिता करण्याइतके 'मातृत्वविहीन' मन आपले नाही असे सासूला ठणकावणारी सून 'पाळणा' या कथेत दिसते. पण विषय चांगला निवडूनही त्याची तार नीट न सांभाळता आल्याने ती कथा अखेर नुसती 'चुटके'वजा ठरते. यातील बहुतेक कथांच्या नशीबी अशीच आपत्ती आली आहे असे म्हणता येईल. 'आमरस', 'वचन' या कथातून बाल-मानसशास्त्राचा आधार घेऊन चित्रण करण्यात आले आहे. पण त्यातील 'हरिदासी' वळणाने त्या कथा मनाला चटका लावून जाऊ शकत नाहीत. एकादे प्रमेय घेऊन त्या आधारे 'उदाहरण' सोडवावे तसा प्रकार येथे घडला आहे. 'श्याम', स्त्रीधन, प्रतिष्ठा 'गुंजन' या कथाही अशाच सामान्य उतरल्या आहेत. नुसत्या लेखन सफाईने वाचक मोहून जात असला तरी त्याच्या मनांवर परि-णाम त्यामुळे होत नाही, असे प्रत्ययाला येते.

प्रा. ना. सी. फडके यांच्या लेखन-वैशिष्टयांचा वसा लेखकाने जसाच्या तसा घेतलेला दिसतो, पण फडक्यांजवळ जे आहे ते मात्र त्यांच्याजवळ नाही. ते म्हणजे वाचकांवर आपल्या लेखनकला चातुरीने असामान्य जादुगिरी करण्याचा गुण.

**[गुंजन. ले. भा. द. खेर.** नव महाराष्ट्र प्रकाशन, पुणे २. पृष्ठे ११०, मूल्य ३ रु.]

## ठाव घेणारी कादंबरी

**भा.** द. खेर यांची ही चाकोरी सोडून लिहिलेली ही कादंबरी. जर्मनी व भारत यांच्या पार्श्वभूमीवर ती आधारलेली आहे. जर्मनीतील एका घराण्याच्या तीन पिढ्यांना भारतीय धर्म व संस्कृतीबद्दल वाटणारी ओढ हा प्रस्तुत कादंबरीचा विषय. या विषयाच्या अनुषंगाने मग लेखकाने कादंबरीतील पात्र-योजना व वातावरण निर्मिती केली आहे. मानफ्रेड म्युलर, फ्रान्झ म्युलर आणि अल्बर्ट म्युलर या तीन व्यक्तींच्या रोमारोमात भारतीय संस्कृती मुरलेली होती. फक्त त्यांच्या 'गंगेच्या' गाढ आकर्षणाला विरोध करणारी एर्ना हीच होती, पण तिलाही अखेर त्याच मार्गाने कसे, अभावितपणे, जावे लागते हे या कादंबरीत प्रामुख्याने सांगितले आहे. काहीशा फ्लॅश-बॅक पद्धतीने ही कादंबरी लिहिली गेली आहे.

अल्बर्ट म्युलरला भारताची ओढ असते पण एर्ना म्हणजे आपल्या आईच्या खातर तो नोकरीच्या निमित्ताने भारतात जाण्याची संधी टाळतो, पण योगायोग असा की, विमानाने तो तेहरान येथे जात असताना त्या विमानाला अपघात होतो व अल्बर्टला 'भारतीय' समजून गंगेत मुक्ती मिळते व नायिकेच्या (भारती) वडिलांचे शव 'जर्मन' समजून जर्मनीत अल्बर्टच्या घरी पोहोचते. शेवटी अल्बर्टपासून गर्भ राहिलेली पण लग्न राहून गेलेली भारती सून म्हणून एर्नाच्या घरी राहाते व तिच्या पोटातील जीव 'गंगे'च्याच मार्गाने जाणार हे एर्नाला स्पष्ट दिसू लागते!

अशी एकूण कादंबरी. खेरानी विषय निवडला आहे चाकोरीवेगळा, पण त्याची मांडणी केली ती मात्र चाकोरी-निष्ठच. त्यांच्या लेखनावर फडक्यांच्या लेखनाचा जो नेहमीचा ठसा दिसतो, तो याही कादंबरीत आहेच. त्यामुळेच या कादंबरीत भारतीय संस्कृती व तत्वज्ञान व जर्मन संस्कृती यांचा जो एक 'संघर्ष' गाठता आला असता, तो त्यांना साधला नाही. त्यांनी स्वामी वगैरे आणले आहेत, तत्त्वचर्चा आणली आहे, पण केवळ थातुरमातुर, अशा प्रकारच्या कादंबरीत तत्वचिंतन सखोल यायला हवे होते. भारतीय तत्वज्ञानाचीच नव्हे तर गंगेची ओढ खरोखरीच लागली आहे या जर्मनांना हे लेखक सांगतो म्हणूनच मानावे लागते. ते प्रत्ययाला येत नाही.

म्हणूनच जे घडले व घडविले गेले ते सर्व वरवरचे. वा. म. जोशी किंवा वि. वा. शिरवाडकर यानी तत्त्वज्ञानाची डूब दिलेल्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत, त्यांच्याशी तुलना करता खेरांची कादंबरी अगदीच मामुली ठरते. त्यांना 'देह' सापडला, पण 'आत्मा' गवसला नाही असेच नाईलाजाने म्हणावे लागते. झाले गेले गंगेला मिळाले यावरच समाधान मानावे लागते. ही कादंबरी कंसात ठाव घेणारी असली तरी प्रत्यक्ष वाच-नात नाही.

**–पद्माकर कुलकर्णी**

**[बर्लिन गंगेला मिळाले. ले. भा. द. खेर** प्रकाशक : सौ. संजीवनी खेर, जयश्री प्रकाशन, २ नारायण पेठ, पुणे–२ पृष्ठे ११३, मूल्य रु. ३ ]








## कथाना लागलेले गालबोट

रेगे जेव्हा वास्तवाचा आधार देऊन काल्पनिक अद्भूतात हिंडू लागतात तेव्हा त्यांच्या कथांना विलक्षणत्व येते. "मासा आणि इतर विलक्षण कथा" या कथासंग्रहातील कथा अशा विलक्षण आहेत. परंतु एक मात्र जाणवते ते म्हणजे विलक्षणत्वाच्या नादात या कथांतील माणसांचे विश्व हरवून जाते. आणि अद्भूताच्या एकाच साच्याच्या कथांचा जन्म होतो. वैशिष्टय एवढेच रहाते की ह्या ठिकाणीहि रेगे 'माणसा'ला विसरत नाहीत. त्यांची कल्पनाशक्ति इतकी तरल आणि तीव्र आहे की तिने विणलेल्या जाळ्यात वाचक कळत न कळत गुंतून पडतो. जेव्हा जाग येते तेव्हा अद्भूत नाहीसे होऊन वास्तवाची साय तेवढी मनावर उरते. यातील बऱ्याचशा कथा भूतकथा आहेत तर काही चमत्कृतिपूर्ण आहेत. रेगे यांच्या प्रतिभेने निर्माण केलेली 'मासा' ही कथा त्यांच्या कल्पना-सामर्थ्याची जशी साक्ष देते तशीच त्यांच्या माणसाच्या निरीक्षणाचीहि साक्ष देते. ऑफिसला निघालेले नाना अपघातात आटपतात, तरीहि जगण्याची जाणीव त्याना सोडून जात नाही... आणि ते 'वरच्या' लिफ्टमधून जातात. (जैसी जीर्णे वस्त्रे सांडिजे) 'काठचांची प्रेतयात्रा' सूचकतेने मानवी स्वभावाची अखेर दाखविते. रघूच्या अबोल प्रेमाची कहाणी ही कुठल्या तरी बेटावर संगीताच्या स्वरात सुनंदेला सांगितली जाते. (ऐक, सुनंदा ऐक!) भविष्याच्या आधाराने खून करणाऱ्या रामूशेटच्या हाती अखेर सापडलेला ज्योतिषी (खंड्या, मैना कुणाची?) अशा तऱ्हेच्या कथांतून कलाटणी देणारे योगायोगाचे वास्तव दिसते. काही कथा तर केवळ भूताची गोष्ट सांगण्याकरिता सांगितलेल्या आहेत. 'जाड्या कामताची गोष्ट', फणीधराचा सुळका, 'वेताळाचा ताबीज' ह्या कथा केवळ चमत्कृतीशिवाय वेगळे वैशिष्टय दाखवीत नाहीत. अद्भूताचे सामर्थ्य मनावर फार काळ मोहिनी घालू शकत नाही. त्यामुळेच अशा कथांचा एक प्रकारे साचा तयार होतो. म्हणूनच मला वाटते रेग्यांची 'माणसे' या ठिकाणी न दिसता 'विलक्षण'पणा धारण केलेल्या भूतकथा आणि चमत्कृतीच तेवढ्या दिसतात. अद्भूताचे हे वेडे सोडले तर रेगे पुन्हा माणसांच्या कथा लिहू शकतील पण या संग्रहानंतरचे कुणी सांगावे ?

मराठी कथेत आपल्या प्रतिभेने त्यानी काव्य निर्माण केले. कवितेच्या जवळ जाणारी कथा मात्र "मासा आणि इतर विलक्षण कथा" मध्ये आढळत नाही.

**–श्रीहरि जोशी**

**[मासा आणि इतर विलक्षण कथा. ले. सदानंद रेगे.** पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठे २२६ किं. ६ रु.]

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची प्रकाशने

**मुंबई** मराठी साहित्य संघाच्या संशोधन विभागातर्फे भाषा, साहित्य, इतिहास ग्रंथालय चळवळ वगैरे अनेक विविध विषयांवर संशोधन सुरू आहे. महाराष्ट्रेतिहास परिषदेची कल्पना साकार करण्यातही या संस्थेचा फार मोठा वाटा आहे.

महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेपासून संघाच्या या संशोधन कार्याला अधिकच जोराने चालना मिळाली आहे. या संशोधनातून निर्माण होणारे सर्वच साहित्य त्या त्या विषयातील तज्ञ किंवा अभ्यासूना जसे बोधक ठरते, तसेच सामान्य माणसालाही त्या पुस्तकांमुळे एरवी क्लिष्ट वाटणाऱ्या विषयांची आवड निर्माण होते. संशोधनाचे सर्वात मोठे यश तेच असते.

उदाहरणादाखल ग्रंथालय–चळवळ. ही चळवळ आपल्या देशात १९४७ नंतर जोमाने वाढीस लागली. पण ग्रंथालयाचा कायदा १८६७ मध्ये पहिल्यांदा अस्तित्वात आला. त्याची शताब्दी या वर्षी आहे, हे कितीशा अन्य लोकांना, विद्वानाना माहीत आहे?

तसेच महाराष्ट्रेतिहास परिषदेत वाचले गेलेले निबंध सलगपणे वाचताना खूपच नवी माहिती कळते. तर 'राणा जयसिंह आणि शिवाजी' या पुस्तकामुळे राजनीतीमधील एका महत्वपूर्ण विषयाची इत्थंभूत माहिती मिळते.

मराठी वाङमयाबद्दल बोलायचे तर म्हैसूरच्या राजाने मराठीत काव्यरचना केल्याचे समजल्यानंतर आपण आश्चर्यचकीत होतो.

मुंबई मराठी साहित्य संघातर्फे होणाऱ्या या संशोधनासाठी सानांपासून थोरांपर्यंत सर्व जण करीत असलेल्या परिश्रमांचे कौतुक आणि स्वागत सर्वांनीच मनापासून करणे इष्ट व आवश्यक ठरते. त्या संशोधन विभागातर्फे प्रसिद्ध झालेल्या काही पुस्तकांची ओळख येणेप्रमाणे:

**(१) मराठी संशोधन भाग १ व २.** संपादक श्री. अ. का. प्रियोळकर. मराठी संशोधन पत्रिकेत ऑक्टोबर १९५३ ते जुलै १९६१ व ऑक्टोबर १९६२ ते २ जानेवारी १९६५ या दोन कालखंडात प्रसिद्ध झालेला मजकूर त्यात समाविष्ट आहे.

(२) **महाराष्ट्रातील ग्रंथालयांची सूची** (महाराष्ट्र राज्य ग्रंथालय–संघ, प्रकाशन ३ रे) संपादक श्री. शां. ग. महाजन. ग्रंथालय शास्त्राचे जिज्ञासू तसेच अभ्यासूना हे पुस्तक उपयुक्त ठरेल.

भारतीय ग्रंथ संरक्षण कायद्याची शताब्दि–श्री. अ. का. प्रियोळकर:– ग्रंथालय शास्त्राला आपल्या देशात मानाचे पान अलिकडेच मिळाले असले, तरी त्या संबंधीचा कायदा होऊन शंभर वर्षे या वर्षी पूर्ण होतील. मूळ कायदा १८६७-मध्ये लागू करण्यात आला. त्यातील फेरबदलासहित त्या कायद्याची माहिती या पुस्तिकेत आहे.

**ऐतिहासिक प्रकाशने–**

(१) महाराष्ट्रेतिहासाची साधने (भाग दुसरा) संपादक श्री. वा. सि. बेंद्रे. इसवी सन १५०१ ते १७५० या २५० वर्षांच्या महाराष्ट्रेतिहासाची जुळणी करण्यासाठी उपयुक्त पडलेल्या दस्तावैजांच। तपशील या ग्रंथात आहे. या खंडानंतर १७५१ ते १७५८ ह्या काळावधीची माहिती (तिसरा विभाग) व








त्यानंतर सन १५०० पर्यंतच्या साधनांची 'माहिती देणारा (पहिला विभाग) प्रसिद्ध होईल.

(२) **संभाजीराजे भोसले**–वा. सी. बेंद्रे. शहाजीमहाराजांचे जे दोन चिरंजीव जगले त्यापैकी संभाजी राजे मोठे व शिवाजी हे धाकटे होत. त्यानी शहाजी-राजांबरोबर अनेक ठिकाणी तरवार गाजविली. परंतु दुर्दैवाने ते वडिलांचे पूर्वीच निधन पावले. आणि शिवाजी राजांच्या दैदिप्यमान कारकीर्दीमुळे ते मागेच राहिले. त्यांच्या कार्याचा योग्य तो परिचय या पुस्तिकेत आहे.

(३) **निबंध संग्रह**:– महाराष्ट्र-इतिहास परिषदेच्या पहिल्या अधिवेशनात (६ व ७ नोव्हेंबर १९६५) सादर करण्यात आलेले निबंध यात समाविष्ट करण्यात आले आहेत. तसेच इतिहास परिषदेची नियमावली व घटना यांचाही समावेश असल्याने संशोधकांना व इतिहासाच्या विद्यार्थ्यांना हे पुस्तक उपयुक्त आहे.

(४) **रट्टवंशीय बल्लाळ याचा अर्धापूर शिलालेख**–मराठवाड्यात अजूनही ठिक-ठिकाणी हिंदू इतिहास व संस्कृतीचे भग्नावशेष आढळतात. त्यातही काही तरी सुदैवाने चांगल्या अवस्थेत सापडतात. त्याबाबत श्री. न. शि. पोहनेरकर व श्री. हरिहर ठोसर यांची कामगिरी फार मोठी आहे. अर्धापूर (जि. नांदेड) येथे सापडलेल्या अशाच एका शिलालेखाची माहिती या पुस्तिकेत आहे.

**राणा जयसिंग आणि शिवाजी महाराजः**–ले. वा. सी. बेंद्रे. मराठेशाहीच्या इतिहासातील अत्यंत महत्वाच्या ज्या काही घडामोडी आहेत, त्यापैकी राणा जयसिंग व शिवाजी यांचा पत्रव्यवहार आणि संबंध ही एक होय. दोन दिल् एक झाले तर.....हे एकीचे सूत्र याच संदर्भात आजही उपयुक्त ठरते. शिवाजीच्या अभ्यासकानाच काय पण सामान्यपणे राजनीतीची आस्था असणाऱ्यानाही सदर पुस्तक संग्राह्य वाटेल कारण साम तसेच भेद-नीति आणि दंड-नीति याबद्दलचे विवेचन त्यात आढळते.

**प्राचीन मराठी कविता खंड ३ व ४ :**– संपादक श्री. ज. शां. देशपांडे:– कृष्णदासांची बालक्रीडा व विष्णुदास नाण्याची चक्रव्यूह कथा (खंड ३) आणि हयग्रीवाचार्यकृत गद्यराग असे काव्य या दोन खंडात आहे. खंड ४ च्या संपादनात कृष्णदास महानुभाव यांनीही भाग घेतला आहे. उल्लेखनीय गोष्ट ही की 'बालक्रीडा' हे काव्य तंजावर येथील सरस्वति महाल ग्रंथसंग्रहालयात आहे.

**परमहंस सभा व तिचे अध्यक्ष रामचंद्र बाळकृष्ण**–श्री. अ. का. प्रियोळकर. दीडशे वर्षापूर्वी राणी व्हिक्टोरियाचा अंमल पक्का स्थापन झाल्यानंतर ख्रिश्चन धर्मप्रचाराचे जबरदस्त प्रयत्न प्रत्याप्रत्यक्ष रूपाने करण्यात आले. त्याना यशस्वीपणे तोंड देऊन हिंदू संस्कृति व धर्म यातील जळमटेही झाडण्याचे काम त्यावेळी त्या थोर व्यक्ति व संस्था यानी केले, त्यात या परमहंस संस्थेचाही वाटा आहे. तो इतिहास विशेषतः मुंबई शहरातच घडलेला असल्यानेही त्याला तसे स्थानिक व प्रांतिकही महत्व आहे. त्यादृष्टीने हे पुस्तक एरवीही वाचनीय आहे

**उषाहरन कथाः**– संपादक डॉ. वि. बा. प्रभुदेसाई (नागपूर विद्यापीठ) वऱ्हाड-मध्य प्रदेशात अद्यापी जी अप्रकाशित स्फुटकाव्ये सापडतात, त्यापैकी कविनंदन उर्फ कविश्वरसुत यानी लिहिलेले, 'उषाहरन' हे काव्य डॉ. प्रभुदेसाई यांना गवसले. शृंगाराच्या बारीक कलाकुसरीनी युक्त असे हे आणखी एक प्राचीन काव्य उषाहरणाचे आगळे दर्शन घडविते.

**केशवसुतांच्या कवितांचे हस्तलिखितः**– ले. सं. ग. मालशे. केशवसुत जन्मशताब्दिनिमित्त १९६६ साली नानाविध आणि विपुल लिखाण प्रसिद्ध झाले आहेच. त्यातच या पुस्तिकेने केशवसुतांच्या अभ्यासकांचे संग्रह पूर्ण करण्यास हातभार लावला असे म्हणणे योग्य ठरेल.

**देवनागरीची ध्वनिलिपी**–ले. श्री. अ. का. प्रियोळकर: 'बोलणे तसे लिहिणे' हा एक सदैव चर्चेचा विषय ठरलेला आहे. यादृष्टीने साहित्यिक तसेच संपादक व मुद्रक याना मार्गदर्शन ठरणारी अशी ही पुस्तिका आहे. शुद्धलेखनाचे नवीन नियम लागू झाल्याने तर या पुस्तिकेची गरज अधिकच भासते.

**ताडपत्रावरील मराठी ग्रंथ-कलानिधिः**– ले. अ. का. प्रियोळकर. मुनि जिनविजयजी यांनी ताडपत्रावर लिहिलेल्या 'कलानिधि' या मराठी गद्यकाव्याची ओळख सदर पुस्तिकेद्वारे करून देण्यात आली आहे. मुनींची भाषा मराठी नसूनही ते गद्यकाव्य वाचनीय ठरले आहे.

**म्हैसूरचा तिसरा कृष्णराज व त्याचा मराठी ग्रंथ: संख्यारत्न कोषः**– म्हैसूरचा आणि मराठीचा संबंध घनिष्ठ असल्याचा आणखी एक पुरावा या पुस्तकान्वये भाषा संशोधकाना मिळालेला आहे.

**ग्रियर्सनच्या संग्रहातील मराठी भाषेचे नमुनेः**–एकच गोष्ट एकूण बहात्तर 'मराठी' बोलीत वाचावयाची असेल आणि त्यातील रंजक तसा रोचक फरक ध्यानात घ्यावयाचा असेल तर ही पुस्तिका सामान्य मराठी वाचकाचेही संग्रही असावी. विशेषतः मराठी राज्यात शासन व्यवहारातही मराठीचा वाढता प्रादुर्भाव व त्यानुषंगाने निर्माण होणारी चर्चा यांच्यात गम्य असणाऱ्या [illegible] नी ही पुस्तिका जरूर नजरेखालून घालावी.

–य. स. दातार












## डॉ. ना. गो. कालेलकर

### साहित्य अकादमीचे मानकरी

**आपल्या** आवडीचा एकच विषय घेऊन, त्यालाच आपल्या जीवनाचे सर्वस्व समजून एखाद्या योग्यासारखी एकांडी (वाटणारी) तपश्चर्या करण्याची परंपरा महाराष्ट्रात तशी नवी नाही. एकेका विषयाचा घ्यास घेऊन त्यातले 'तज्ञ' पण सिद्ध केलेल्या महा-राष्ट्राच्या थोर परंपरेत **डॉ. ना. गो. कालेलकर** यांचा सन्मानपूर्वक समावेश केला जातो. भाषेविना माणूस जगू शकत नाही. भाषेशी माणसाचे लागेबांधे किती जवळचे असतात ह्याचा काहीसा विकृत प्रत्यय अलिकडच्या काळात आपण साऱ्यांनीच घेतला आहे. पण भाषेचे सोने ज्या भाषाशास्त्र्यांच्या स्पर्शाने होऊ शकते अशा परिसां-पैकी डॉ. कालेलकर हे एक आहेत. भाषा सोपी व प्रिय होत असली तरी 'भाषाशास्त्र' मात्र सोपे नाही. प्रिय होण्यासारखेही नाही. त्यामुळे 'भाषाशास्त्रा'च्या अभ्यासाचे आवाहन (व आव्हानही) स्वीकारणारे डॉ. कालेलकर हे प्रकृतीने "आगळे" व 'वेगळे'च ठरतात. डॉ. कालेलकर ह्यांनी भाषा व भाषाशास्त्रा-सारखा किचकट (वाटणारा) विषय 'व्यासंगा'साठी व संशोधना-साठी निवडला असला तरी त्यांचे व्यक्तित्व मात्र प्रसन्न आहे. वृत्ती रसिकाची आहे. पंडिती 'रुक्षता' त्यांच्या व्यक्तित्वात नाही. जाड भिंगाआड लुकलुकणारे डोळे समोरच्या माणसाच्या हृदयाचा (व विषयाचा) तळ शोधीत जणु फिरत असतात असे वाटते. शांत, संयत व्यक्तित्व त्यांना लाभलेले आहे. सतत चिंतनाने व विचारात गुंतून राहण्याच्या स्वभावामुळे ते एकाकी वृत्तीने वावर-ताना दिसत असले तरी ते एकांडे नाहीत. माणसांना भोवती जम-वून 'बैठकी' रंगविण्याचा त्यांचा स्वभाव नसला तरी व त्यांना सततोद्योगामुळे ते जमत नसले तरी माणसे जमली म्हणजे कालेल-कर रंगतात, रसिकते बैठक रंगवितातही. मुख्यतः त्यांची वृत्ती अंतर्मुख अशीच आहे. कठोर भासतात. पण अरसिक नाहीत. पुस्तकांचे व मराठी सिनेमाचे त्यांना वेड आहे. मराठी सिनेमा चांगला नसला तर त्यावर चिडतील, संतापतील. त्यामुळे काहीसे अस्वस्थही होतील. पण तरीही पुन्हा दुसरा 'मराठी' चित्रपट पहायला जातीलच. असा हा 'मराठी'चा अभिमानी माणूस. पुस्तके नुसतीच विकत घेणार नाहीत. त्यांची देखभालही नंतर तेवढ्याच साक्षेपाने करतील. आपल्याला आवडलेली पुस्तके इतरांनाही देतात. त्यावर चर्चा करतात. पुस्तक नच परत आले तर पुन्हा ते विकत घेतात असला स्वभाव. एवढा व्यासंग केला, पण त्याचे प्रदर्शन नाही. प्रसिद्धि नाही. प्रसिद्धीची हौस नाही. स्वभाव नाही. ही तपस्या किती खडतर होती त्यासंबंधीही फारसे कुणाजवळ बोलणार नाहीत. एम्. ए. नंतर काय ह्या विचारात ते असताना सयाजीराव गायकवाडांनी त्यांना फ्रान्सला पाठवले व झ्यूल ब्लांकासारख्या विख्यात भाषाशास्त्र्यांकडे त्यांचे पायाभूत शिक्षण पार पडले. ग्रंथसंख्या कमी–चिंतन–मनन, वाचन अधिक. असमाधान अधिक त्यामुळे लेखन कमी. 'अजून काही तरी कमी आहे' असाच विचार अधिक. त्यामुळेच त्यांचे चिंतन सतत नवे, ताजे व मूलग्राही झाले आहे! **'ध्वनिविचार'** ह्या पुस्तकाच्या प्रसिद्धीने त्यांची कोंडी फुटली. डॉ. कत्रे यांनी त्यांना पुण्यास पाचारण केले आणि मग डॉ. कालेलकर यांच्या हातून बरेच लेखन होऊ शकले. भोवती चांगले वलय उत्पन्न झाले. त्यात निवडक माणसे आहेत. कालेलकर स्वतःबद्दल कमी बोलतात. त्याबद्दलचे कौतुक कमी. आठवणीत गुरूच्या व क्वचित काकांच्या आठवणींना स्थान. साहित्य चर्चा अधिक. ललितलेखन आवडते. चर्चाही आवडते. पांडित्य आहे पण पांडित्याचा गर्व नाही. एकांत हवा असला व प्रियही असला तरी जीवन एकांडे, माणूसघाणे नाही. आयुष्यातले अनेक चढउतार पाहून, मानसन्मा-नाचे बाबतीत फारशी आस्था नसूनही त्यांच्या गुणांचा गौरव आज साहित्य अकादमीकडून झालेला असूनही कालेलकर स्थित-प्रज्ञ वृत्तीने वावरत आहेत. तपस्वी तपस्वी म्हणतात ते ह्यापेक्षा काही वेगळे असतात का?

साहित्य अकादमीने त्यांच्या "भाषा–इतिहास आणि भूगोल," ह्या ग्रंथाला १९६७ चे "उत्कृष्ट मराठी ग्रंथ" म्हणून जे पारितो-षिक दिले आहे त्याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करतो.








अनुक्रमणिका



## " बहुरुपी " पु. ल. दे.

अनेक सुंदर लेणी लेवून महाराष्ट्र प्रांती अनेक "पुरुषोत्तम" आजवर जन्माला आले. अजूनही ही भूमी अशा पुरुषोत्तमांना जन्म देण्याबाबत वांझ झालेली नाही आणि म्हणूनच हा स्वतःला 'महाराष्ट्र' म्हणून संबोधतो. ह्या अनेक पुरुषोत्तमांपैकी एक आहे, **पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे** ! कर्तृत्वाचा, कल्पकतेचा, गुणवत्तेचा, कलातपस्येचा, वक्तृत्व–नाटयादि गुणांचा पुरुषोत्तम ! ब्रह्माचे वर्णन करताना 'नेति' 'नेति' शब्द वापरला जातो. त्याचे रूप, त्याचे वर्णन शब्दात पकडता येत नाही. मन गोंधळते. नकारात्मक 'नेति' ने सुटका करून घ्यावीशी वाटते. मनाचे समाधान गवसत नाही. पु. ल. देशपांडे यांच्या व्यक्तित्वाचा जेव्हा जेव्हा मी विचार करतो तेव्हा मीही असाच गोंधळून जातो. आणि मग सहजपणेच 'नेति' असा उद्‌गार तोंडातून बाहेर पडतो. पु. ल. देशपांडे हे देवाघरची कितीतरी सुंदर लेणी लेवून आले आहेत. त्यामुळेच अमुक लेणे ल्यालेलेच पु. ल. दे. खरे असे म्हणणे कठिण जाते. व्यक्तित्वाचा शोध तसा सोपा नसतो. अगदी वर्षानुवर्षे जवळ वावरलेल्या माणसालाही तो लागतोच असे नाही. मग हत्ती आणि सात आंधळ्यांची गत होते. पु. ल. देशपांडे ह्यांचे व्यक्तित्व ह्या विविध लेण्यांमुळे बहुरुपी, बहुरंगी, बहुढंगी झालेले आहे. सुरांचे कान (आणि मन) ह्या माणसाजवळ आहे. हास्य आणि अश्रु ह्यामध्ये विणलेला हा जीवनपट पाहण्याची सहृदय दृष्टि ह्या माणसाजवळ आहे. चिंतन आहे. मनन आहे. जीवनातले नाटय आणि जीवनातले काव्य जाणण्याची रसिक दृष्टि ह्याला लाभली आहे. साहित्य आणि संगीत ह्या दोन कलांच्या अंतिम स्वरुपाबद्दल, त्यांच्या जीवित ध्येयाबद्दल, त्यांच्या मनात सुस्पष्ट कल्पना आहे. उपरोध व उपहास ही दोन शस्त्रे परजीत अनेक सामाजिक दंभ दोषांवर लगुड-प्रहार करण्याचे सामर्थ्य ह्या माणसाजवळ आहे. जीवनातल्या अंगा-गातले सौंदर्य पाहण्याची व ते सुंदरतर करून परत जीवनालाच अर्पण करण्याची कलारसिक दृष्टि व चिंतनशीलता ह्या माणसाजवळ आहे. माणसात रमणारा, माणसांना रमविणारा व रमवीत रमवीत जीवनाचे मौलिक तत्वज्ञान सांगून जीवनांना 'अर्थ' देणारा हा माण आहे. जीवनातल्या भव्य, दिव्य, उच्च उदात्ताचे ह्याला आकर्ष आहे. असे काही दिसले, भावले की अजूनही पु. ल. दे. नतमस्त होतात. अनेक मानसन्मान त्यांना मिळाले. साहित्य अकादमी यंदाचे श्रेष्ठ नाटककार म्हणून त्यांचा गौरव केला आहे. नाटयक्षेत्रा भारतीय शासनाने हा मान मराठीला व त्यातल्या त्यात 'पु.ल.' द्यावा ह्यात दोघांचाही गौरव आहे असे मला वाटते. नट–नाटक कार, दिग्दर्शक, एकपात्री प्रयोगाचे जनक, बालनाटयाचे लेख लोकनाटयाचे लेखक, एकांकिका लेखक, संगीत दिग्दर्शक, पटक लेखक, दिग्दर्शक, गडकरीदर्शनसारख्या कार्यक्रमाचे निर्म इत्यादि गोष्टींनी त्यांनी आपले संपन्न व्यक्तित्व महाराष्ट्राच्या सेवे लावले आहे. 'पु. लं.'चे यश हा एक 'चमत्कार' वाटतो. पण त्याम खूप मोठी साधना आहे. ती कष्टसिद्ध निर्मिती आहे ही गो विसरून चालणार नाही. मी त्यांना नव्याने लाभलेल्या बहुमानाबद्द त्यांचे अभिनंदन करतो.

यशासारखेच 'यशस्वी' होत रहा, देशपांडे !!

## ' महाराज ' कहाळेकर

जालना येथे भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्य प्रा. भालचंद्र कहाळेकर म्हणजे 'चालते–बोलते–करते' साहित्यि आहेत. 'लिहिते' साहित्यिक मात्र त्या मानाने कमी आहेत. त्यामु मराठवाडा व काही मोजकी मंडळी सोडल्यास महाराष्ट्रात त्यां विशेष गाजावाजा आणि 'बाजा' नाही. पण कहाळेकरांना पूर्णप दबणाऱ्या आणि मानणाऱ्या दोन ख्यातनाम साहित्यिकां चोखंदळ व रसिक मराठी वाचक चांगला ओळखतो. ते म्हण कै. बी. रघुनाथ आणि प्रा. नरहर कुरून्दकर. प्रा. नरहर कुरून्दक ज्या थोड्या व्यक्तींच्या पुढे पूर्णपणे नागर होऊन वागतात त्यात कहाळेकर हे मुख्य एवढे एकच गमक कहाळेकरांविषयी भरपू कुतुहल जागृत करावयास पुरेसे आहे.

तसे पाहिले तर श्री. कहाळेकरांनी लिहिले नाही किंवा लिहि ण्याचे टाळतात असे नाही. किंबहुना त्यांनी जे मोजके फुटक लेखन केले आहे ते इतके धारदार, मुद्देसूद व विचारप्रवर्तक आ कीं, त्यांनी सातत्याने लिहिले तर त्यांचे साहित्य मराठी सारस्वता निर्विवाद लेणे ठरावे. आणि ते लिहित नाहीत हा त्यांच्यावर ए कडक आरोप आहेच. परन्तु त्यांच्या न लिहण्याचीहि एक जी भूमिक आहे त्यात त्यांचा एक प्रकारचा त्याग अनुस्युत आहे. आजं मराठवाडा पूर्वीच्या निजाम राज्यात होता व मराठी भाष मराठी भाषिक आणि मराठी साहित्य-साहित्यिक यांच्या उदया व अभिवृद्धीस वातावरणाचे वाळवंट होते असे म्हणूनहि प्रतिकू परिस्थितीची पूर्ण कल्पना येणार नाही. अशा काळात आपले तन मन (आणि धनहि) मराठी वजनाकरता अखंडपणे वेचणारे श्री कहाळेकर हे एकटेच होते असे म्हटल्या ते मुळीच अतिशयोक्ती ठरू नये. कारण निजामीतील मराठी लेखक त्यांचे साहित्य याचं केवळ आस्थेवाईक चौकशी करून कहाळेकर थबकत नसत. साहि

त्याचा स्रोत वाहता राहावा याकरता तळमळून सक्रिय बनत. याचाच परिणाम म्हणून मराठी भाषा व साहित्य याना कायम अभय व बैठक मिळवून देण्याच्या त्यांच्या ध्यासातून व धडपडीतून निजामीतील तरुण मराठी भक्तांना एकीकडे उत्तेजित व प्रेरित केले तर दुसरीकडे त्या सर्वांना एका सूत्रात गोवणारी मराठवाडा साहित्य परिषद मार्गस्थ झाली. याकरता कहाळेकरांनी आपल्या वैयक्तिक जीवन व सामाजिक जीवन, व्यावसायिक जीवन व ध्येयवादी जीवन असा भेद केला नाही. उलट वैयक्तिक जीवनाचा लोपच केला. लिहिण्याचेही राहून गेले. आता सवय कमी झाली आहे पण साहित्यप्रेमाचा जोम आहे म्हणून आशा आहे. कहाळेकरांच्या वैयक्तिक जीवनाबद्दल स्वतः ते आणि स्वकीय यात बोलणे क्वचित येते. स्वतः सदा मागे राहून इतरांना पुढे आणण्यात त्यानी पुढाकार घेतला. श्री. कहाळेकर राष्ट्रीय वृत्तीचे व चारित्र्याचे गृहस्थ असून याबद्दलच्या त्यांच्या निष्ठा एवढ्या उग्र आहेत की, त्यात तडजोड नाही. केसांचे खुंट गोळा केलेले डोके, खादीचा पोषाख आणि ठाम पाऊले रोवत चालण्याची ढब ही काही अंशी त्यांच्या वैचारिक शैलीवर प्रकाश टाकणारी वैशिष्ट्ये म्हणता येतील.

अर्थात् यावरून श्री. कहाळेकर कर्मठ आणि रुक्ष गृहस्थ आहे असा कुणी समज करून घेतला तर तो गैरसमज ठरेल. कारण तल्लख बुद्धीचे कहाळेकर अतिशय संवेदनक्षम असून नवनवे टिपून घेणारे त्यांचे निर्लेप मन आजही चिरतरुण आहे. मर्ढेकरांच्या घराण्याचे ते प्रथमपासून चाहते व पुरस्कर्ते तसेच आजच्या वाङ्मयातले जे जे चांगले त्याचे स्वागत करण्याची त्यांची जागरुक वृत्ती याची साक्ष आहे. सर्वसाधारणपणे प्रौढत्व व प्रतिष्ठा ही जेव्हा स्थिर होण्याच्या मार्गावर असतात तेव्हा इतरांचे ऐकून घेण्याची वृत्ति सहनशील व समावेशक राहत नाही. परन्तु कहाळेकर प्रथमपासून जेवढे ऐकवू शकतात त्यापेक्षा जास्त ऐकण्याची क्षमता ही त्यांची साहित्यिक म्हणून आणखीन् एक शक्ति होय. यामुळेच त्यांनी मराठवाड्यात इतके साहित्यप्रेमाचे मळे पिकवले आहेत की त्याची मोजदाद करणे अशक्य. सदा इतराना पुढे आणण्यातच मग्न असणाऱ्या कहाळेकराना त्यांच्या आजारातील अनवधानतेची संधि साधून मराठवाडा साहित्य परिषदेने संमेलनाचे अध्यक्ष करून जी शिक्षा केली आहे त्याबद्दल परिषदेचे अभिनंदन केले पाहिजे !

## भिषग्रत्न ग. पां. परांजपे

सांगलीजवळच्या हरीपूर खेड्यातील व त्याच्या परिसरातील साऱ्या साऱ्या जनतेला वैद्यराज ग. पां. परांजपे हे नाव सुपरिचयाचे आहे. वैद्यराजानी आपली उर्भ हयात अक्षरशः गोरगरीबांच्या सेवा कार्यार्पणीं व्यतीत केली आहे. हरीपूरला पन्नास वर्षापूर्वी त्यांनी स्वतः स्थापन केलेल्या कुमार औषधालयाने आतापर्यंत दोन लाखावर रुग्णांना विनामूल्य औषधोपचार केले आहेत. त्यांच्या या सत्कार्याबद्दल ह. भ. प. ल. रा. पांगारकर, लो. टिळक, डॉ. मुंजे, डॉ. हेडगेवार, अण्णासाहेब कर्वे, डॉ. कुर्तकोटी, पं. सातवळेकर, न. चिं. केळकर, स्वा. सावरकर, इ. नामवंत व्यक्तीनी गौरव केला आहे. वैद्यराजांची ही संस्था भारतातील एकमेव असल्याचा निर्वाळा त्यावेळी या थोरानी दिला होता.

ही एवढी एकच गोष्ट नव्हे तर वैद्यराजांच्या सत्कर्माचे आणखीनही पैलू आहेत. आपल्या जनतेत ज्ञानदान करण्यासाठी म्हणून त्यांनी 'आरोग्यसंवर्धक माला' काढली. या मालेतर्फे साष्टांग नमस्कार, ताक, वृद्धांचे आरोग्य, सायकलचे परिणाम, मुलांची जोपासना, हृदयविकार, डोकेदुखी, इ. विविध विषयांवर उपयुक्त पुस्तके प्रकाशित करून ती प्रसंगी त्यांनी मोफत वाटली. १९२० मध्ये 'आरोग्य संवर्धक मंडळ' ही संस्था स्थापन करून दीर्घानुभवी व तज्ज्ञाकडून रोग्याना मोफत सल्ला दिला. आजही ही संस्था हेच कार्य करीत आहे. १९२० च्या सांगलीतल्या प्लूच्या साथीत स्वयंसेवक पथक उभारून हजारो रुग्णांची तनमनाने त्यांनी सेवा केली. हरीपूरसारख्या खेड्यात वसंत व्याख्यानमालेचे आद्य प्रणेते तेच आहेत. हरीजनासाठी १९२२ त फिरती वाचनालये त्यांनीच सुरू केली. विशेष म्हणजे १९३० त साष्टांग नमस्काराच्या प्रचारार्थ देशभर दौरा करून २५० सप्रयोग व्याख्याने त्यांनी दिली. आज वयाच्या ७५ व्या वर्षीही त्यांचे हे कार्य आपले चालूच आहे. १९५९ मध्ये आत्रेय आयुर्वेद महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांची कामगिरी उल्लेखनीय आहे. १९२४ साली कर्नाटक आयुर्वेद संमेलनाने व १९३५ साली डॉ. कुर्तकोटींनी त्यांना अनुक्रमे आयुर्वेद चिकित्सक व भिषग्रत्न या पदव्यानी विभूषित केले. आपला सारा जन्म लोककारणासाठी झिजविलेल्या या आधुनिक ऋषीला या महिन्यात ७५ वर्षे पूर्ण होत आहेत त्यांनी आपल्या आयुष्याची शंभरी पूर्ण करावी ही शुभेच्छा.

—आदित्य












# 'ललितकलादर्श'चा नेत्रदीपक हीरकमहोत्सव !!

## एक 'अपूर्व' महोत्सव–

**आम्ही** "दाक्षिणात्य माणसे 'प्रारंभशूर' म्हणून ओळखले जातो. 'संस्था–सातत्य' हा त्यामुळेच अभावानेच गवसणारा भाग! संस्था निघणे हे सहजकृत्य. टिकणे अपवादात्मक! त्यामुळेच एखाद्या गोष्टीचा मुहूर्ताचा नारळ फुटला की "संस्था कधी फुटणार?" म्हणून चर्चेला सुरुवात होते. 'नाटक कंपनी'च्या बाबतीत तर हा 'विनोद' नेहमीच केला जात असे. आजही ही परिस्थिति फारशी पालटली आहे असे (निदान महाराष्ट्रात तरी) म्हणता येत नाही. जुन्या नाटक कंपन्याच 'फुटत' होत्या असे नाही. 'नव-नाटच'वाली कंपनीही टिकत नाही असे दिसते. म्हणूनच इथे एखादी 'कंपनी' टिकली–वर्ष दोन वर्ष नव्हे तर 'साठ' वर्षे टिकली–की तो कौतुकाचा व अभिमानाचा विषय बनतो. तो योग 'अपूर्व' ठरतो.

"**ललित कलादर्श**' ह्या खास लोकाश्रया-खालील संगीत नाटक मंडळीला साठ वर्षे पूर्ण झाली. ह्या हीरक महोत्सवाच्या निमित्ताने एक नाटचमहोत्सव साजरा झाला. साहित्य संघ मंदिर (गिरगाव) व श्री शिवाजी मंदिर (दादर) अशा दोन ठिकाणी हा महोत्सव साजरा झाला. धाडस व प्रयोग हे दोन ललितकलेचे विशेष! दोन ठिकाणी महोत्सव हे एक धाडसही होते आणि तो एक प्रयोगही होता. हे धाडस, हा प्रयोग आर्थिकदृष्टचा फारसा फायद्याचा झाला नाही असे ऐकतो पण पराभव पचवूनही असे 'प्रयोग' करीत राहण्याची 'पेंढारकरी' हौस भालचंद्र पेंढारकरातही आहे हेच पुन्हा एकदा सिद्ध झाले.

ह्या महोत्सवात एकूण दहा नाटके सादर करण्यात आली. त्यातली पांच जुनी तर पाच सर्वस्वी नवीन अशी होती. नवीनातली दोन ललितकलेची (खुद्द) एक नाटचसंपदेचे, एक श्री स्टार्सचे व एक लोकनाटच शाहीर साबळे आणि पार्टीचे. ललितकलेच्या दोन्ही कलाकृतींचे पहिले प्रयोग उत्सवात झाले तर वरील तीन्ही नवीन नाटकांचे पहिले प्रयोग त्या त्या कंपन्यांनी मुद्दाम उत्सवात सादर केले. मराठी रंगभूमीच्या इतिहासात नाटक कंपनीचा 'हीरक महोत्सव' जितका अभिनव तितकीच ही गोष्टही अभिनव म्हणून गणली जाईल. भांडणांचाच शाप घेऊन आलेली ही शापित (पण मौलिक) कला आता त्या शापातून मुक्त होत आहे असे आपण मानायचे काय? उत्तर काळच देईल. उत्सवाच्या निमित्ताने हा अभिनव प्रयोग घडवून आणल्याबद्दल मात्र श्री. पेंढारकर, प्रभाकर पणशीकर (नाटच-संपदा) बाबूराव गोखले (श्रीस्टार्स) आणि शाहीर साबळे (अॅण्डपार्टी) यांचे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो. हा प्रयोग ही पुढील, रंगभूमीविषयक नव्या व उपयुक्त प्रयोगांची नांदी ठरो अशी अपेक्षा व्यक्त करतो.

## उत्सवाची 'नांदी'–ललितकलादर्श

**सादरकर्ते पु. ल. देशपांडे**– सांगितले काय? ललितकलादर्शचा साठ वर्षाचा इतिहास. त्याला 'पु. ल.' कशाला? स्मरणिका निघणारच होती. शिवाय बऱ्याच मासिके–वृत्तपत्रातून लेखही आले होते. साऱ्यांना ठाऊक असलेलाच रंगभूमीचा व ललितकलेचा इतिहास सांगायला 'पु. ल. दे' ही 'असामी' कशाला? उत्तरासाठी हा कार्यक्रम बघायला हवा होता येवढेच उत्तर मी देईन. इतिहास होताच. पण त्यात स्मृति होत्या प्रसंग होते. माणसे होती. गाणे होते, सिनेमा स्लाइडस् होत्या, ग्रामोफोनच्या जुन्या तबकडचा होत्या. आणि जुन्या नव्या पिढीतल्या नटांची हजेरी होती. 'पु. लं.'चे सजीव (व खुसखुशीत) भाष्यही होते. ह्या कार्यक्रमातले ते भाष्य वगळले तर कार्यक्रम 'जुजबी' होता, केवळ माहितीपर! सिनेतंत्राने 'सीन्स' सारखे बदलत होते. संन्याशाचा संसार, सत्तेचे गुलाममधील प्रवेश बघत असताना एक गोष्ट जाणवली. ती ही की २५ वर्षांपूर्वी त्या नाटकात आलेले विषय अजूनही जुने झाले नाहीत. त्यानंतरच्या काळात आम्ही काही प्रगति केली नाही का? प्रस्तुत कार्यक्रमात प्रामुख्याने 'ललितकलादर्श'चा इतिहास असला तरी पार्श्वभूमी म्हणून मराठी रंगभूमीच्या गति–प्रगतीचा आलेखही होता. तो सांगताना काही नट-गायक वेष करून आले तर काही (राम मराठे व रामदास कामत) 'सिव्हिल'-मध्येच तानबाजी करीत आले. त्यांची ती रूपे (ऐकवली तरी) पाहवली नाहीत हे खरे! हिराबाईंच्या गाजलेल्या 'राधे-कृष्ण बोल'ची अवस्था केविलवाणी होती. 'पु. लं.'च्याच एका भाषणाचा उल्लेख करून असे म्हणता येईल की ही देव्हाऱ्यातली दैवते आता देव्हाऱ्यात राहू द्यावीत. त्या भावनांना आता धक्का लावू नये हे बरे! नांदी पडद्याला (व प्रेक्षकांना) पाठी दाखवून म्हणण्यातले औचित्य काय? त्यातही छाया-प्रकाशाचा उपयोग केल्याने त्या आकृति मोठ्ठाच विनोद निर्माण करीत होत्या. विनोदी लेखकाची नांदीही (अशी) विनोदी असायलाच हवी होती काय? सुचेता भिडे हिचे नृत्य. रंगभूमीच्या थोर साधकांची (सरकती) चित्रे, जयराम शिलेदार, जयमाला शिलेदार, मा. दामले, आचरेकर, कामत, राम मराठे ह्यांनी नाटच-संगीत रंगविले. कुमारी गिरिजा पेंढारकर हिने उभी केलेली शारदा व तिची 'मूर्तिमंत भीति' परिणामकारक होती. तत्का-








लीन शारदा कल्पनेने जाणवण्याइतपत ते गाणे व प्रवेश रंगला. सर्वात मजा केली नटवर्य नानासाहेब फाटक व दत्ताराम यांनी. दोघांचीही स्वगते फक्कड झाली. फाटकांनी तर (ह्या वयात) टाळी घेतली. गोविंद पटवर्धन यांना रंगमंचावर आणून 'चंद्रिका ही जणू' सादर केली गेली तर पु. श्री. काळ्यांना (पडद्याला नव्हे) टाळी घेवविली गेली.

शेवट बहारीचा—ज्ञानेश पेंढारकर—वय वर्षे सहा—ह्याने जयजय गौरीशंकर-मधल्या 'रमा रमण श्रीरंग' ह्या गाण्याने केला व तुफान टाळी घेतली. त्याचा तो चिमुकला नारद व ते गाणे दीर्घकाल स्मरणात राहील (पु. लं. च्या उपरोध-पूर्ण निवेदनासह.)

## जुनी नाटके—नवे प्रयोग

यात दुरिताचे तिमिर जावो, स्वामिनी, पंडितराज, श्री व जयजय गौरीशंकर ह्या नाटकांचे प्रयोग झाले. त्यातल्या श्री व स्वामिनीबद्दलच लिहितो. बाकीची तीन नाटके आजही प्रेक्षकांसमोर आहेत. 'स्वामिनी' हे ललितकलेच्या तिसऱ्या पिढीचे पहिले नाटक असले तरी आज त्या नाटकाचे प्रयोग होत नाहीत हे मात्र खरे. त्यामुळे त्या नाटकाबद्दल उत्सुकता होती. त्या नाटकातले फक्त पात्र नवे होते—भावना (सुमन ताटे) हे! नाटक रंगले नाही. फार थंडपणे चालले आहे असेच वाटत राहिले. चित्तरंजन कोल्हटकर, हे कसबी नट! रंगत आणणारा कलाकार. त्यादिवशी कोल्हटकरांच्या डोक्यावर जणु "शंकर घाणेकर" स्वार झाले होते. 'ओव्हर ॲक्टिंग' चालू होते. कोल्हटकरांचे सहसा असे होत नाही. काशीच्या स्वगतात 'जीव' नव्हता. नुसते पाठांतर होते. ती वाक्ये मालतीबाईंनी म्हणून टाकली. भिडली नाहीत.....त्या मानाने शोभा—विभाची कामे चांगली रंगली. मन्दा पेंडसे ठीक-ठाक! पण एकूण प्रयोगाला थंड—संथ (डल्) स्वरुप आले होते. त्यामानाने 'श्री'चा प्रयोग चांगला रंगला. भिस्त होती नटवर्य नानासाहेब फाटकांवर! कुसुमाकर ही त्यांची एकेकाळची गाजलेली भूमिका! ती त्यांनी 'लहरपूर्वक' चांगली केली. नानासाहेब हे तसे जिद्दी नट आहेत. (पण लहरी). ललितकलेच्या ह्या महोत्सवात मात्र ते २५—३० वर्षे जणु मागे गेले आणि वापूरावांबरोबरच जणु आपण वावरत आहोत अशा 'डिग्निटी'ने "ग्रेसफुली" वागले. त्यांचा आनंद त्यांच्या वागण्या—बोलण्यात ओसंडत होता..मंगला (श्री) फाटक (कुसुमाकर) भालचंद्र (श्रीकान्त) दत्ताराम (श्रीचे वडील) ह्यांची कामे रंगली. लीलावती (कात्यायनी) चे कामही (वाव कमीच म्हणा) चांगले झाले. 'श्री'चे पुनरुज्जीवन व्हायला हरकत नाही असे मला तरी जाणवले. 'रेसची फिल्म' फार लांबते, कंटाळा आणते हे नमूद करतो. वर्वेमामांचा पोलीस अधिकारी साधा पोलीस सुद्धा वाटला नाही. 'श्री' मध्ये गातात फक्त पेंढारकर. त्यांचा आवाज त्या दिवशी लागला होता. (अलिकडे तो नेहमीच असे सहकार्य देतो असे नाही म्हणून कौतुक) घाणेकरांऐवजी (दुरिताचे तिमिर जावो) आलेले विनायक दामले अजून 'फिट्ट' वसायचेत'!!

## नवीन नाटके (ललितकलेची)

एक नाटक आणि दुसरी नाट्य—संगीतिका! नाटक—झाला अनंत हनुमंत लेखक—विजय तेंडुलकर ..संगीतिका—गीत-सौभद्र—कविवर्य—ग. दि.माडगुळकर—संगीत दिग्दर्शक—वसंत देसाई. दोन्हीही प्रयोग नवे. नावे मोठी—अपेक्षा मोठ्या. कारण पूर्वसंचित मोठे. अंतिम फलित काय? तेच सांगतो आधी. नाटकासंबंधी!! नाव एकदम आकर्षक. कल्पना एकदम नवी—आकर्षक वाटणारी (चालू जमाना उडणाऱ्या माणसांचा आहे की) इकडली माणसे ह्या पक्षातून त्या पक्षात उड्या मारतात. लाभ—साऱ्यानाच मंत्री होता येते. रशिया अमेरिकेतली माणसे अंतराळात उडतात. लाभ—देशाचा होतो. विज्ञा-










[नाचा होतो. प्रस्तुत नाटकातला अनंत हनुमंत कुलकर्णीही असाच एक दिवस उडतो. त्याला श्रद्धेच्या बळावर पंखाविना उडता येते. त्याची ही किमया कुणाला खरी वाटत नाही. (श्रद्धेचे डोळे साऱ्यानाच कुठून लाभणार?) पण ती कल्पना काही 'धंदेवाईक' मंडळींना मोहविते आणि Exploit करून त्यावर तुंबडी भरायचा डाव ती रचतात. ह्या नव्या शक्तीचा उपयोग समाजहितासाठी करण्याची अनंताची इच्छा असते. पण त्याच्या पंगु मुलाचे निमित्त करून व त्याच्यासंबंधीची त्याची माया ध्यानी घेऊन भोवतीची माणसे त्या दिव्य साक्षात्काराचा बाजार मानतात. आणि त्यात कुचंबलेला, अगतिक अनंत हनुमंत अखेर उडून अवकाशात जातो आणि काही काळ ह्या जगाशी त्याची बातचीत होत राहिली तरी अखेर तो 'मूक' होतो. आजच्या जगात अशा 'अनंत हनुमंतां'ची कशी कुचंबणा होते ह्याचे विदारक चित्रण प्रस्तुत नाटकात आहे. ही एक सामाजिक उपरोधिका ( Social Satire ) आहे. विषय पुन्हा तेंडुलकरीच ! तेंडुलकर ह्यांच्या जवळजवळ सर्वच नाटकात आजचा कुचंबलेला माणूस, त्याची खंत, त्याचा संघर्ष—त्याच्या वेदना आणि तडफड यांचे चित्रण असते. 'व्हेन' वेगळी, घटना वेगळ्या—कार्यक्षेत्रे वेगळी असतात. 'अनंत हनुमंता'ला आंतरिक शक्तीचा साक्षात्कार होणे. मग त्याचे एकाकित्व सुरू होणे, त्याची भावना, त्याचा 'अनुभव' हा चेष्टेचा व मग 'धंद्या'चा विषय होणे. त्याची अगतिकता, मौन, तडफड सारे फार वास्तव. काळजाला अस्वस्थ करणारे. पहिल्या अंकातले चित्रण तर फारच बोलके! पगाराभोवती फिरणारी 'माया' मोठी विदारक. पगाराऐवजी चुकून बिलांचे पाकीट देण्यातून मिळणारी गोड कलाटणी आणि मग Exploitation. सारे शंभर टक्के वास्तव ! पण त्यामुळेच ह्या नाटकाच्या तिसऱ्या (व दुसऱ्या अंकातल्या काही भागाला) फारच 'स्वस्त' (चीप) स्वरुप आले आहे. विशेषत: तिसरा अंक तर ही उपहासिका फारच लांबली आहे. त्यातली 'सवंग' भाषणे, 'चालू' पुढाऱ्यांच्या नकला, सर्वत्र दिसून येणारा पक्षीय (अंध) अभिमान, नटचांच्या नावावर प्रसिद्ध होणारे लेखन, (मुलाखती वगैरे) ह्यांचे व असल्या 'दिव्य' अनुभवांचेही 'कंत्राट' करणारे देवराज ह्यांचे फारच प्रत्ययकारी व विदारक चित्रण तेंडुलकरांनी केले आहे. ह्या साऱ्या वातावरणात मूक बनलेला (केविलवाणा) अनंत हनुमंत व त्याची अगतिकता मनाला विद्ध करते. तरही पण तिसऱ्या अंकातला हा 'मसाला' सर्वसाधारण प्रेक्षकाला कंटाळा आणतो. तो 'चीप' (स्वस्ता) आहे हे जाणवत राहतेच. माझ्या मते 'उडणे' हे सुद्धा प्रतीकात्मक असावे. भव्य—दिव्याचा हृदयात होणारा साक्षात्कार व 'चालू' जगात त्या साक्षात्काराच्या कल्पनेची होणारी खिल्ली ह्याचेच भेदक चित्रण तेंडूलकरांना अभिप्रेत असावे. कीर्तनकाराचे सूत्रचालन मला अगांतुक वाटले नाही त्यातही एक 'उपरोध' आहे. कीर्तनकार

अखेर 'धंदा'च करतात. पण
अजरुपणातून एखादा 'अनंत हनु
होतो. धंद्याच्या परिभाषेपासून
अलौकिक तत्वाचा साक्षात्क
होऊ शकतो. देवाच्या तोंडून अश
चांगलीच 'शोभा' केली आ
आहे. स्वगत आहे (चांगले स्व
उडणे आहे. पत्रकार आहेत.
तले चांगले घेऊन, पचवून
राहतो. प्रयोग फारच चांग
श्रेय **अरविंद देशपांडे** यांचे
**गणेश सोळंकींच्या** आजवरच्या
पेक्षा सर्वस्वी वेगळी भूमिका (
त्यांना लाभली आहे. त्यांनी
तो न्याय दिला आहे. कमी
अनंताची व्यथा-वेदना ते डोळ्य
हालचालीतून व्यक्त करतात
त्यानंतर क्रमच द्यायचा तर सख
ह्यांचा. अनंताचा मेव्हणा-
मॅन'च्या जातीचा हा तरुण. तड
आणि 'संधी'ची वाट पाहणा
त्याला अनंताच्या उड्डाणात
असे वाटते. तो व देवराज
भावना चांगली होती. पण श
तर नियती !! पेंढारकर (
मालतीबाई (अनंताची पत्न
(अनंताची मुलगी) ह्या
करांना वाव कमी. पण 'न्य
दिला त्यांनी. गिरिजा पेंढारक
करील असा विश्वास मिळतो.
मोठी पण उगीच आपलं तं
झालं !! विषय नवा. म
नाटक ? जरा चीपच् झालं

## गीत सौभद्र ( संगीतिका

प्रयोग मोठा, साक्षेपी,
मराठीतला सर्वस्वी प्रथम
एकूण परिणामात मात्र क
"सौभद्र" नाटकाची रंग
गाण्यांची गोडी अवीट.
ताजा राहणारा. त्यामुळे अपेक्ष
कारणे तीच. सौभद्र, ग. दि.
वसंत देसाई—अपूर्व संगम—अ

[पृष्ठ ६४ वर]










अनुक्रमणिका



# इंद्रधनुष्य

—ज्ञानेश्वर नाड

**गेले** दोनएक महिने या सदरातून गतवर्षी झालेल्या फ्रेंच चित्रपटमहोत्सवाविषयी लिहीन लिहीन म्हणत होतो. परंतु सध्याच्या या मुंबईपुण्याच्या 'सांस्कृतिक मोसमा'त बहुतेक समीक्षकांची स्थिती 'रात्र थोडी अन् सोंगे फार!' अशापैकी होते. आज फक्त तीनच विषय घेऊन त्यांच्या भिन्नभिन्न जातींतून एक सूत्र शोधण्याचा प्रयत्न करतो.

## एका गाढवाची कहाणी

माझ्या दृष्टीने या महोत्सवातला सर्वोत्कृष्ट चित्रपट रोबेर ब्रेस्साँ यांचा 'ओ हाझार्द बाल्थाझार' हा होता. ब्रेस्साँ हे आता साठीच्या आसपासचे गृहस्थ असावेत. सुमारे पंचरासोळा वर्षांपूर्वी मी त्यांचे 'एका पाद्रयाची दैनंदिनी' हे चित्र पाहिलेले होत. त्यांच्या या दोन चित्रपटांचा मला सारख्याच प्रमाणात आस्वाद घेता आलेला नाही हे खरे; परंतु नेमक्या याच संदर्भात त्या दोहोंची तुलना उद्बोधक ठरेल.

'दैनंदिनी' फ्रेंच भाषेतच पडद्यावर पाहिली, आणि त्या नव्हाळीच्या वयात तिचा काही अर्थच लागला नाही. 'बाल्थाझार'ला सुदैवाने इंग्रजी सब–टायटल्स होत्या. त्यामुळे ब्रेस्साँला त्यात जे काही म्हणायचे आहे त्यातील बरेचसे समजले. हे दोन्ही चित्रपट एका अतिशय धार्मिक प्रवृत्तीच्या कलावंताने तयार केलेले आहेत हा प्रत्यय प्रथमदर्शनीच आला.

आता फक्त 'बाल्थाझार' जास्त चांगले स्मरणात आहे म्हणून केवळ त्याच चित्रपटाविषयी लिहितो. आपल्याला आश्चर्य वाटेल, पण या चित्रपटाचा नायक आहे एक गाढव. त्याचेच नाव बाल्थाझार! एक निष्पाप पोरगी त्याला आपला मानते, आणि वाढत्या वयाबरोबर होणाऱ्या या पोरीच्या अनुभवातील स्थित्यंतराचे अतिशय हृदयस्पर्शी दर्शन आपल्याला घडते. जणु शेक्सपियरच्या 'मिडसमर नाइट्स ड्रीम'मधील गाढवाच्या मुखवटयात वावरणाऱ्या बॉटमचे अन् टायटानिया या पऱ्यांच्या राणीचे सूतगूतच ब्रेस्साँने फ्रेंच ग्रामीण जीवनाच्या पार्श्वभूमीवर व्यक्त केलेले असावे!

ज्यानी 'इसापनीति' वाचलेली आहे त्यानी पशू आणि माणूस
यांच्यातील या गूढतर नात्याची जास्त चौकशी करण्या
नाही. परंतु ज्या सीमाप्रांतातील खेडयात 'बाल्थाझार'चे
मूळ घरते तेथील लोक कुठले इतके समंजस असायला?
ते त्या गाढवाचा आणि तिच्यावर एखाद्या प्रेयसीइ
असणाऱ्या त्या पोरीचा छळ करतात तो पाहण्यासारखा

अधूनमधून हे गाढव त्या पोरीच्या हातून निसट
कोणी भलतेच मालक लाभतात! कोणी त्याला मारहाण
कोणी त्याचा उपयोग पर्वतराजीत टूरिस्टांना फिर
करतात तर कोणी त्याचा अगदी घाण्याचा बैल करून
त्याच्या या वेगवेगळ्या, औटघटकेच्या मालकांचे न
पाहण्यासारखे आहेत....

एकदा असाच एक वेडसर माणूस त्या बाल्थाझारल
ताब्यात घेतो. त्याला अशी प्रेरणा होते की हे गा
असावे. आणि म्हणून तो त्याला आपल्याकडच्या '
नंदीबैलासारखा एका सर्कशीत राबवू पाहतो! ऐन
वेळी त्या 'सर्वज्ञा'तला जन्मजात गर्दभ जागा होतो! मग
गंमत उडत असेल त्याची कल्पना करा!

बाल्थाझार आणि त्याच्यावर माया करणारी त
यांच्या कहाणीचा शेवट मात्र मन हेलावून सोडणारा आ
माणसानी सारखी कोंडीत पकडून ठेवलेली ती मुलगी वय
त्या गाढवासारखीच बेलगाम, चौखूर उधळते. तिच्या
पणाचा फायदा घेऊन तिच्यावर दादागिरी करणारा ए
आपल्या साथीदारांच्या जोडीने तिच्यावर बलात्कार क
आपल्या स्त्रीत्वाचा तिला चांगला उमज आल्यावर त
सुद्धा एका लोभी म्हाताऱ्याकडून पैसे घेऊन एका रात्रीपु
शय्या सजविते!

बाल्थाझारच्या मृत्यूचा प्रसंग पाहताना महाभारता
रीस हिमालयात आपल्या निर्वाणाची वाट तुडवीत
पांडवांच्यामागे घोटाळणाऱ्या कुत्र्याच्या पौराणिक कथे
वण होते. आणि हे साहजिकच आहे, कारण ब्रेस्साँने
कथाभाग त्याच शैलीत चित्रिलेला आहे!

ब्रेस्साँच्या चित्रिकरणशैलीबद्दल दोन शब्द: अतिशय
छोटया अशा सुटया दृश्यांद्वारे त्याची कथा पुढेपुढे सर
परंतु या सर्व प्रकाराला एक विशिष्ट लय हळूहळू प्र
आणि ज्याना संकलनाच्या लयीचे ज्ञान नाही त्यांना 'ब
साहजिकपणे कंटाळवाणा वाटू लागतो..

माझ्या दृष्टीने, काही कलाकृती आपल्या भोवतालच्या इतक्या पुढे असतात की त्या नीट समजून घेण्यासाठी 'ती' लय आपल्या अंगात भिनविणे इष्ट असते. आणि ब्रेस्साँच्या 'बाल्थाझार'पासून त्याच्यापेक्षा वयाने लहान चित्रपटकर्त्यांनी खूपच काही शिकावे असे वाटत राहते!








## सामन्त आणि बेंद्रे

सध्याचे हे थंडीचे दिवस मोठे वहारीचे आहेत बघा! वटा-टयाच्या चाळीतले समस्त भाडेकरू जरी कोयनानगरला बसलेल्या हादऱ्यामुळे चिंताग्रस्त झालेले असले, तरी रोज पहाटे उठून निदानपक्षी फुटपाथवरल्या शेकोटीचा लाभ घ्यायचे त्यानी ठरविले तरी त्याना ही पुण्यामुंबईची वहार लुटता येईल!

अशाच या मोसमात मला मोहन सामन्त आणि एन्. एस्. बेंद्रे या, आपापल्या परीने प्रथितयश अशा, कलावंतांच्या सहवासाचे सद्भाग्य लाभले. वाटले, हा असा थोरामोठयांचा सहवास नित्य आपल्याला लाभावा!

वयपरत्वे सामन्त आणि बेंद्रे यांच्या व्यक्तिमत्वांत, कलाविषयक दृष्टिकोणात आणि प्रत्यक्ष कलात्मक आविष्कारात जो फरक आहे तो या भेटीगाठीतून विशेषच जाणवला.

सामन्तांचे प्रदर्शन येथील ताज आर्ट गॅलरीत डिसेंबरच्या अखेरच्या आठवडयात होते. ते संपताच बेंद्रयांची सोळा चित्रे तिथेच प्रदर्शनासाठी लावली गेली! सामन्तांचे हे प्रदर्शन तूर्तास तरी मुंबईतील शेवटचे; कारण मार्चमध्ये ते कायमचे रहिवासी होण्यासाठी न्यूयॉर्कला जात आहेत. बेंद्रयांचे प्रदर्शन सात वर्षांनंतर भरले होते. त्यांची निर्मिती विपुल असली तरी त्यांच्या प्रत्येक चित्राला इतकी मागणी असते की ती काही चोखंदळ गिऱ्हाइके परस्पर 'पळवून' नेतात!

बेंद्रयांच्या कलेविषय ललितकला अकादमीने एक छोटीशी पुस्तिका प्रसिद्ध केलेली आहे; परंतु तिला आज केवळ ऐतिहासिक महत्त्वच द्यावे लागेल! परवाच्या त्यांच्या प्रदर्शनाचे नाव अगदी सार्थ होतेः 'सीझन्स ग्रीटिंग्ज!' विठ्ठलराव घाटयांनी वर्णन केलेल्या 'भाई' प्रमाणे बेंद्रयांच्या जीवनातलाही हा जणु 'इंडियन समर'च आहे; आणि हा खास 'भारतीय' कालखंड अजून कित्येक वर्षे फुलत राहणार आहे याची साक्ष त्यांच्या पुष्प-चित्रांत, त्यांच्या निसर्ग-चित्रांत मिळण्याजोगी होती.

मला पसंत पडली नाहीत ती त्यांची काही व्यक्तिचित्रे. आपल्या मुलीचे पोर्ट्रेट त्यानी मोठ्या प्रेमाने केलेले आहे. बेंद्रे म्हणजे परमेश्वराने निर्माण केलेल्या रंगभांडाराचा मोठ्या जाणकारीने लाभ घेणारा चित्रकार! या घरबसल्या रंगविलेल्या व्यक्तिचित्रांत रंगांचे एकमेकाशी असलेले उपजतचे नाते या द्रष्टयाने ओळखलेले आहे!

सामन्तांची सुद्धा अशी एक खास 'घरगुती' कृती आहे. त्यांच्या प्रकृतीतला घसमुसळेपणा तिच्यात लोप पावलेला आहे. सामन्त मोठ्या तयारीने सारंगी वाजवितात हे पुष्कळाना माहीत नसेल. 'सारंगीवाला आणि तबलजी' हेच ते चित्र! सामन्तांची चित्रशैली फार पूर्वीपासून एखाद्या प्राचीन भित्तिचित्राची आठवण करून देणारी आहे. परंतु काही चित्रांत तो परिणाम साधण्यासाठी ते जिवाचा प्रचंड आटापिटा करताना दिसतात! सारंगीवाल्याच्या चित्रांत मात्र या सदा अस्वस्थ असलेल्या कलावंताची 'झपूर्झा' मनोवस्था दिसते. त्याची तंद्री लागलेली आहे, तारा जुळल्या आहेत, अन् तो अस्पष्ट दिसणारा साथीचा तबलजीसुद्धा मोठी धमाल उडवितो आहे!

असे हे सामन्त (स्वखर्चाने, 'युसिस'च्या नव्हे!) अमेरिकन व्हायला चालले आहेत हे काही खरे नव्हे. याचा अर्थ एवढाच की आपल्या देशातील आजची सांस्कृतिक घडी काही त्यांच्या दृष्टीने ठीक बसलेली नाही.

बेंद्रयांना मात्र असे वाटत नाही हे उघड आहे. कारण फार पूर्वीच जग जिंकून आल्यावर वांद्रयाच्या कलानगरातील आपल्या वानप्रस्थाश्रमात मोठ्या खुषीत वास्तव्य करून, खास इंदोरी खाक्या दाखवीत, हा चिंतनशील कलामहर्षी एकामागोमाग एक रंग शोधीत बसलेला आहे!

## पुन्हा साहेबाची नाटके!

मागील काही अंकात ज्या साहेबी नाटकांबद्दल लिहिले तसल्या प्रकारच्या नाटकांचा सध्याच्या दिवसात मोठा सुकाळ दिसतो. तुम्हाला आश्चर्य वाटेल, परंतु हल्ली कॉलेजची पोरेसुद्धा परीटघडीचे प्रयोग बसविताना दिसतात. याचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सेंट झेवियर्स कॉलेजच्या ड्रॅमॅटिक क्लबने ज्याचा अलोकडेच तेजपाल नाटयगृहात प्रयोग केला ते कार्सन मॅकलर्सचे 'मेंबर ऑफ द वेडिंग' हे होय.

कार्सन मॅकलर्स ही ख्यातनाम अमेरिकन कादंबरीकर्त्री काही महिन्यापूर्वीच मरण पावली. अमेरिकेतल्या दक्षिण भागातील विशिष्ट वातावरणाचा आणि नीग्रोविषयक परंपरेचा तिला पुरेपूर अनुभव होता. तिच्या साऱ्याच साहित्यात एक प्रकारच्या समंजस, मानवतावादी दृष्टिकोणातून तिने या अनुभवाकडे पाहिलेले दिसते. खरे म्हणजे कल्पनाशक्तीच्या साह्याने निर्माण केलेले एक अखंड आत्मचरित्र असेच तिच्या साहित्याचे स्वरुप आहे.

'मेंबर ऑफ द वेडिंग' या नाटकात मुख्य पात्रे तीन, आणि त्यांचे सारे बोलणे-चालणे, किंबहुना आत्मप्रकटीकरण, एका सामान्य गावांतल्या एका सर्वसाधारण घरातील स्वयंपाकघरात चालते. हे स्वयंपाकघर अन् त्याला लागून असलेले परस या दोहोंनी या नाटकापुरते तरी रंगमंचावर एक विश्वच निर्माण केलेले आहे म्हणा ना!

बेरेनीस ही या घरातली नीग्रो स्वयंपाकीण. फ्रॅन्की ही नुकतीच वयात येणारी मुलगी, आणि जॉन नावाचा एक छोटासा-परंतु वयाच्या मानाने पोक्त-असा तिच्या नात्यातला मुलगा. फ्रॅन्कीच्या भावाचे होणार असते लग्न, अन् त्या लग्नसमारंभात मिरवून घ्यायची तिला मोठी हौस. तिला एक साधी गोष्ट कळत नसते, अन् ती ही की आपला भाऊ अन् त्याची वाङनिश्चित वधू ही दोघे एकमेकांच्या पाशात इतकी गुंतून गेलेली आहेत की आपल्याला त्यांच्या जीवनात काही स्थान तूर्त तरी नाही!

बेरेनीस आणि जॉन ही दोन वेगवेगळ्या प्रकारे फ्रॅन्कीच्या वयोविशिष्ट वेडपटपणाला सांभाळून घेणारी दोन पात्रे. बेरेनीस-









मध्ये नीग्रो वर्णीयात पूर्वापार चालत आलेला अनुभवनिष्ठ शहाणपणा, श्रद्धा आणि धिमेपणा दडलेला आहे. तिच्या बोलण्या-चालण्यात या नीग्रो लोकांचे धीरगंभीर संगीत आहे, लय आहे, थोडीशी स्थितप्रज्ञताही आहे. जॉन हा तर बोलूनचालून मुलगाच. त्याचा हूडपणा, वात्रटपणा चालू असतो. तो फ्रॅन्कीला चिडवीत असतो, तिच्या आविर्भावांची नक्कल करीत असतो, आणि वेळीप्रसंगी तिचे अन् त्याचे सूतगूतही जमत असते !

अर्थात् हे नाटक आहे मूलतः फ्रॅन्की वयात येते त्यासंबंधी. संदर्भ अमेरिकन समाजस्थितीचा परंतु मनोवस्था पंधरासोळा वर्षांच्या उंबरठ्यावर रेंगाळणाऱ्या साऱ्याच मुलींच्या. मॅकलर्स-बाईनी रंगविलेली फ्रॅन्की ही एक टॉमबॉय आहे. नाटकातील तिचा हूडपणा, तिचा कलंदरपणा अक्षरशः गगनाला गवसणी घालणारा आहे. अर्थात् तिचे वडील तिला व्यावहारिक जगाच्या कोत्या दृष्टिकोणातूनच मोजीत मापीत असतात, आणि त्यामुळेच फ्रॅन्की हे स्वभावचित्र विशेष लक्षात राहण्याजोगे झालेले आहे–तो प्रत्येक घरचा अनुभव आहे !

या नाटकाचे दिग्दर्शन केले होते प्रा. निशा दा कुन्हा या सेंट झेवियर्स कॉलेजातील इंग्रजीच्या प्राध्यापिकेने ! या बाई एक अव्वल दर्जाच्या चित्रकार आहेत हे मध्यंतरी जहांगीर गॅलरीत ज्यानी त्यांचे प्रदर्शन पाहिले होते त्याना माहीत अ[सेल.] थिएटर्स ग्रूप या संस्थेसाठी त्यानी चेकॉव्हचे 'अंकल व्हा[न्या' हे] नाटक बसविलेले ज्यांच्या ध्यानात त्याना त्यांच्या अंगच्या [या] दिग्दर्शनगुणांची प्रचीती आलेली असेलच.

परंतु मला आश्चर्य वाटते ते प्रत्यक्ष प्रयोगाच्या व्यावस[ायिक] दर्जाचे ! फरिदा काइजी, वीरा मेहता व यूइंग यानी, अ[नुक्रमे] बेरेनीस, फ्रॅन्की व जॉन यांच्या भूमिका त्या त्या व्यक्तिवि[शेषाशी] पूर्णपणे समरस होऊन केल्या. त्यातही फरिदा काइजी [यांनी] आपल्यापेक्षा वयाने, वर्णाने आणि वाणीने सर्वस्वी वेगळ्या [असलेल्या] त्या नीग्रो स्वयंपाकिणीचे काम उत्तम केले म्हणून [त्यांचे] विशेष कौतुक !

याच नाटकाच्या आसपास मी इतर काही साहेबी [नाटके] पाहिली; पैकी दोन अस्सल साहेबांनी बिर्ला नाटघगृहात [सादर] केलेली ! पण 'मेंबर ऑफ द वेडिंग' जसे माझ्या लक्षात रा[हिले] आहे तसे काही त्यानंतरचे कोणतेच इंग्रजी नाटक राहिलेले न[ाही.]

सांगायचे काय, तर आपण बूटमोजे घातले की आपणसुद्धा काल अस्सल साहेब असल्याचे नाटक करू शकतो असे मला व[ाटते.]

---

**(पृष्ठ ६० वरून–रंगमंच)**

सारेच संगीतमय. राक्षसही गातो आणि विदुषकही गातो. बाकीची पात्रे तर मुळातच गाणारी. त्यामुळे तीही गातात. 'संगीतिका कम् नाटक' असा हा एक अभिनव प्रयोग होता. संपूर्ण नाटकाची संगीतिका सादर करणे कठिण होते. म्हणून त्यातला एक भाग सादर करण्यात आला. त्या भागाचे तीन अंक करण्यात आले होते. पहिल्या अंकात नारद+अर्जुन, दुसऱ्या अंकात अर्जुन, राक्षस व सुभद्रा व तिसऱ्या अंकात कृष्ण-वक्रतुंड यांना "गा – खुषीत गा" असे सांगण्यात आले होते. गाण्यांच्या चाली रसानुकूल देण्यात आल्या होत्या. मूक नाटकातली गाणी स्वाभाविकपणेच रंगली. गायकांनी त्यांना न्याय दिला. त्या गाण्यांच्या आधीची व नंतरची गाणी स्वाभाविक क्रमाने 'उत्क्रान्त' होतील अशी काळजी वसंत देसाई यांनी घेतली होती. त्यामुळे 'ढगांचे-बदल' फारच चांगला वाटला. अनेक रागांचे कसबी मिश्रण त्यांनी चालीत केले आहे. मला खटकले ते विदुषकाचे गाणे ! विदुषकाच्या गाण्यात 'सरगम'चा जो अतिवापर केला आहे तो 'सह्य' नाही व 'प्रस्तुत'ही नाही असे वाटते. संगीतिकेतला 'सहच' अंक म्ह. पहिला अंक. त्या अंकात मा. दामले (नारद) व रामदास कामत (अर्जुन) हे गातात. पण मैफल भरवीत नाहीत. विशेषतः मास्टर अनंत दामले ह्यांचे सारे गाणे सजीव व साभिनय असल्याने त्यांनी चांगलाच रंग भरला. कामत गायले छान. ह्यावेळी त्यांनी अभिनयही 'केला' म्हटले पाहिजे. अन्यथा ते नुसते गातात (चांगले). **राम मराठे** (कृष्ण) सौ. **जयमाला शिलेदार** (सुभद्रा) खूप (मैफलीतले) गातात. शब्द कळावेत हा संगीतिकेचा हेतु. पण ह्या दोघांच्या गाण्यात नेमके शब्दच हरवतात. रामदास कामत (अर्जुन) राक्षसाला मारून येतात (असे आपले मानायचे) एरव्ही त्यांच्या पोषाखावरून ते धुळवड-रंगपंचमी खेळून आल्यासारखेच वाटतात. 'धनुष्य बाण' (एका विशिष्ट पोझमध्ये) घेऊन अर्जुनाने सतत वावरले पाहिजे हा अट्टाहास कां ? त्यात विनोद असा की, राक्षसाला मी निःशस्त्र असतानाही मारले व म्हणून माझे हे कपडे फाटले. रक्तवर्ण झाले अशा [अर्थाचे] गाणे अर्जुन म्हणतो ते मात्र धनु[ष्य] सरसावून–भलताच विनोद झाला [!] माडगूळकरांची सारी गाणी श्रोत्य[ांपर्यंत] पोहोचली नाहीत. पण जी पोहच[ली ती] चांगली होती असेच म्हणता येईल[.] भाग संगीतिकेत येताना साह[जिकच] विस्तार पावतो. पण हा वि[स्तार] अपरिहार्यच नव्हे काय ? ह्या संगीत[िकेचा] प्रयोग एकूण कंटाळवाणा झाला[.] कारण मला तर असे वाटते की [या] प्रकारामुळे कथानकाला 'गति' येत [नाही.] त्यामुळे प्रेक्षक रेंगाळतो. कंटा[ळतो.] संगीत साज महत्वाचा ठरल्याने [अभि]नयाला तसा 'वाव' नाही. त्या[मुळे] प्रेक्षक त्या त्या भावनांशी समरस [होऊ] शकत नाही. कलावंत चांगले, विषय-च[ांगला,] कवि – संगीतकार चांगला [;] तरीही हा अभिनव प्रयोग म्हणावा [तसा] रंगला नाही हे मात्र खरे !!

[अ...]







## भाषिक दंगली आणि शिवसेना

**भाषाविषयक** नवे विधेयक लोकसभेत मान्य झाले व राष्ट्रपतींनी आता त्यावर शिक्कामोर्तबही केले आहे. पण कायद्यानेच केवळ कामे पार पडतात असे समजणे चुकीचे आहे. तसा अनुभवही नाही. अन्यथा कोटयवधी रुपयांचा प्राप्तिकर 'येणे' आहे असा वार्षिक हिशोब द्यावा लागला नसता. दारुबंदीच्या कायद्याने खरोखरच 'हातभट्टी'ची सुद्धा कुणालाही मिळाली नसती. भाषा विषयक कायदा झाला असला तरी भाषाविषयक 'कडवे'-पण व 'कडवट'पणही कायम आहे. ते (तथाकथित) अखिल भारतीय पुढाऱ्यांच्या मनात कायम आहे, मग सामान्य जनतेच्या मनात न राहिले तरच नवल. कधी कधी हे कडवेपण व कडवटपण पाहिले की माझ्या मनात एक विचार येतो तो असा की, हाच कडवेपणा जर ह्या माणसांनी १९४७ साली दाखवला असता आणि अशाच गाडया जाळल्या असत्या, बसेस पेटवल्या असत्या, सरकारी कार्यालये पेटवली असती, साहेबी शिपायांवर बॉम्ब फेकले असते तर कदाचित ह्या देशाचे विभाजन व तज्जन्य आपत्ति टळल्याही असत्या. पण हे होणे नव्हते. कारण आपापसात लढण्याबद्दलच मुळी आम्ही प्रसिद्ध आहोत. आमच्या इतिहासाच्या पानोपानी असा आत्मघात नोंदविलेला आहे. त्या भावनेतूनच भाषिक दंगली सुरू झाल्या आणि प्रतिक्रियात्मक रूप घेऊन मग दक्षिणेतही ते लोण पसरले. भावना तीव्र झाल्या. इतक्या तीव्र की, तामीळ परिषदेच्या निमित्ताने केंद्राने मुद्दाम १५ पैशांचे तिकीट काढले तर त्याची विक्री करायला सुद्धा त्या प्रांताच्या मुख्यमंत्र्याच्या स्तरावरच्या माणसाने विरोध केला. खुर्चीमुळे गुणवत्ता येते, जबाबदारीची जाणीव उत्पन्न होते असे आपण मानतो. पण भाषिक अं[illegible]ने 'राष्ट्रीय' विचार, राष्ट्रहित आज दिसेनासे झाल्यासारखे



दिसते आहे. 'भाषा' हा विषय खरे तर वादाचा विषय होऊ शकत नाही. आणि "साहेबाची भाषा" हा तर नाहीच नाही. पण तो झाला आहे खरा. त्यातून उत्तरेत दंगली पेटल्या आणि दक्षिणेत तीव्र प्रतिक्रिया झाली. ते उग्र रूप पाहून पुन्हा आता उत्तरेत भयानक उग्र आंदोलन सुरू झाले आहे. आणि ह्या आंदोलनाचा शेवट काय होणार आहे कुणास ठाऊक ? त्यातून कटुता वाढेल, पोकळी उत्पन्न होईल. वैफल्य येईल. आजची तरुण पिढी 'जखमी' होईल. त्या जखमा चिघळत राहतील व जुन्या इतिहासाची पुनरावृत्ति होईल. हे चित्र भडकपणे रंगवीत नाही. हा संभाव्य क्रम म्हणून मांडला आहे. आज सर्वच दृष्टींनी विघटनकारी शक्ति उफाळून आल्या आहेत. भाषाप्रांत, जात इत्यादि निमित्ते म्हणजे निमित्तेच ! आतून पेटलेली विघटनकारी शक्ति ही निमित्ते घेऊन जाळपोळ करीत फिरते आहे हेच खरे !! ह्या जाळपोळीबद्दल संबंधितांचा नुसता शाब्दिक निषेध करूनच चालेल असे मला वाटत नाही. त्यांचा योग्य अन्वयार्थही लावला गेला पाहिजे. स्वातंत्र्यपूर्व काळी माणसे हीच होती. प्रांतही हेच होते, जाती ह्याच होत्या, भाषा ह्याच होत्या धर्म, संस्कृति हीच होती. देव दैवतांची नावेही राम, कृष्ण, शिव आणि लक्ष्मी हीच होती. देश एकच होता. फक्त राज्य दुसऱ्याचे होते. चाकरी दुसऱ्याची होती. त्यासाठी स्वीकारलेली भाषा व बाह्य वेष दुसऱ्याचा होता. पण त्या सान्याचा आम्ही मनोमन द्वेष करीत होतो. स्वातंत्र्य हवे होते. आले. पण गुलामी सरली नाही. मानगुटीस बसली आहेसे दिसते आहे. तेव्हा शरीर गुलाम, मन स्वतंत्र असे होते. आता शरीर मुक्त, आणि मने गुलाम असे भयानक चित्र दिसते आहे. नेमके जे हवे होते, ज्यासाठी बलिदाने घडली, तेच आम्ही गमावून बसलो आहो. आक्रोश मात्र स्वातंत्र्याचा चालू आहे. मने गहाण पडली म्हणून आपला परका कळेनासा झाला आहे. 'पक्ष' हे अखेर पांघरूण आहे. बाह्यवेष आहे. पण सर्वांचे नमस्कार अखेर 'केशवाप्रत' तरी जायला हवेत ना? पण तसे दिसत नाही.

ह्या निमित्ताने एक गोष्ट स्पष्ट झाली. मी स्वतः "शिवसेने"च्या चळवळीला १०० टक्के मानतो असे नाही. तिचे ध्येय व कार्य मर्यादित आहे व राहील असेच मला वाटत आले आहे. पण वेळी अवेळी शिवसेनेच्या नावाने गळा काढून रडणारे तथाकथित ढोंगी पत्रकार व पुढारी ह्यांना एक सवाल मात्र मला विचारावासा वाटतो तो हा की "महाशय, अजून आपण गप्प कसे ?" दक्षिणेत भाषेच्या नावाने हे दोनदा घडले. त्यात एक विशिष्ट पद्धत होती. शिस्त होती. त्या विषयात राजगोपालाचारी, कामराज, सुब्रह्मण्यम्, भक्तवत्सलम् इत्यादि साऱ्या राष्ट्रीय (व आंतरराष्ट्रीय) पुढाऱ्यांनी घेतलेली आत्यंतिक भूमिका पाहिली की शिवसेना १०० टक्के 'राष्ट्रीय' आहे हे मनावर अधिक ठसते. शिवसेनेने कोठलेही आत्यंतिक मार्ग आचरले नाहीत. गाडया उलटू दिल्या नाहीत. मुंबईतले 'माटुंगम' आहे तिथेच आहे. एकाही दाक्षिणात्याच्या दुकानाला 'धक्का' लागला नाही वा भाषिक शाळा उध्वस्त झाली नाही वैचारिक आंदोलन मात्र शिवसेना संघटित








करीत आहे आणि तरीही तिच्याविरुद्ध ठणाणा होत आहे. ह्या विषयात तीव्र निषेध करणाऱ्यांची दातखिळी खुद्द मद्रास, आंध्र, केरळमध्ये मात्र कां वसते ? सुब्रह्मण्यम् तर राजीनामा देते झाले. मग ह्यावेळी ते कोठे होते ? त्यांनी निषेध केला का ? राजाजी एका ठिकाणी तरी जैठा मारून विरोधाला वसले होते का ? गोपालन काज करीत होते ? माऱ्यांची भूमिका केवळ प्रेक्षकांची होती असे दिसते. आणि तरीही ही मंडळी राष्ट्रीय वरं का ? आणि शिवसेना म्हणे प्रांतीय. संकुचित ! तिच्यापासून राष्ट्रैक्याला भयानक धोका आहे (म्हणे) हे सारे अचाट आहे. बेफाट आहे. म्हणूनच अधिक निषेधार्ह व निंद्य आहे. शिवसेनेचे वैर राष्ट्रद्रोही कम्युनिझमशी आहे. शिवसेनेभोवती असलेली अन्य प्रांतीय मंडळी कडवी प्रांतीय आहेत. त्यातून दडपला गेलेला मराठी आवाज शिवसेनेच्या मुखातून गरजतो आहे. पण राष्ट्रहित जसे महाराष्ट्राने कधी डावलले नाही, तसेच शिवसेनेनेही ! भाषिक दंगलींच्या निमित्ताने तथाकथित राष्ट्रीय पुढाऱ्यांचे पितळ उघडे पडले. आणि त्या पार्श्वभूमीवर शिवसेनेचे सुवर्ण मात्र उजळून निघाले असेच म्हणणे न्याय्य ठरेल. भाषिक भस्मासूर अखेर कुणाकुणाच्या मस्तकी आपला हात ठेवणार आहे कुणास ठाऊक ? अखेर आम्हीच पुरून उरणार आहोत असा विश्वास मात्र वाटतो.

## 'अब्दुल्ला' नाटकाचा नवा प्रयोग

इति श्रीमति इंदिराजी. नाटक होणार. पुनराज्जीवित होणार अशा घोषणा होत होत्या. नांदी आली. पात्र परिचय झाला आणि ईदच्या दिवशी (आता ईदच कां असा प्रश्न कृपया विचारू नये. आमच्या (निधर्मी) मनात 'तसे' काही नाही. सोडायचेच होते. सोडले. आता नेमकी त्यादिवशी ईद निघाली त्याला गृहमंत्री –प्रधानमंत्री तरी काय करणार? त्यांना ईद थोडीच रोखता येणार होती?) पडदा वर झाला. शेर–इ–काश्मीर (वगैरे वगैरे असलेले) शेख अब्दुल्ला मुक्त झाले. ते वंदिस्त कां होते व सुटले कां ? नका ना प्रश्न विचारू? जरा अडचणीचेच प्रश्न हे ! पण सुटले! अटी नाहीत. मुक्त-संचार ! आता त्यांनी पत्रकार परिषद बोलावली. थोरामोठ्यांच्या गाठीभेटी घेतल्या. अजून भेटी चालू आहेत तसा काश्मीर प्रश्न अस्तित्त्वात नाही असं म्हणतात. थोर लोक म्हणून गेले. आजचे थोर लोकही म्हणतात. काश्मीरचे वडे वजीर सादिक साहेवही परवा तेच म्हणाले. काश्मीरचे स्थान ठरले. ते भारतात आहे हेही निश्चित (असंच सारे सांगत आले) आणि तरीही शेखसाहेब आल्यापासून जे सांगत आहेत त्याच्याशी ह्याचा मेळ वसत नाही. काश्मीर भारतातच आहे तर मग अब्दुल्ला हे भारतीय नागरिक नाहीत हे कसे? त्यांच्या मनात संदेह कां? आणि जर ते भारतातच आहे तर मग 'पाकिस्तान'चा उल्लेख अब्दुल्ला वारंवार कां करतात? कुठे आहे ते पाकिस्तान! त्याचा नि काश्मीरचा संबंध काय ? शेख अब्दुल्ला नाटकाचा नवा अर्थ काय ? त्यांच्या सुटकेची कारणे कोणती ? कुणाचे दडपण वगैरे ? नाही ! नाही !! कुणाचेही दडपण नाही (असे म्हणतात) शेखसाहेबांचे मत-परिवर्तन वगैरे? नाही. तेही नाही. नेहरूनंतरची एक थोर प्रेषित असल्याची स्वप्ने शेख साहेबांना पडत आहेत. नेहरूंची 'कान गोष्ट' मला ठाऊक आहे असं ते म्हणतात. ती गोष्ट करण्यासाठीच तर ते १९६४ साली पाकला गेले होते. पण अचानक पंडितजी वारले. शेख परत आले. ती कानगोष्ट अपुरीच राहिली. पण भारत –पाक मैत्रीचे नेहरू-स्वप्न आपण साकार करू असा प्रेषिताचा आव तूर्त तरी त्यांनी आणला आहे. "भारत व पाक यांची शान व मान कायम राहील असा 'मार्ग' शोधण्याचे दायित्व त्याच्या शिरी आहे (असे ते म्हणतात.) मग "काश्मीरची समस्या नाही." वगैरे गप्पा घोषणांचे काय ? त्या आपल्या घोषणा बरं का ! त्या आपल्या करायच्या असतात. राजकारणात हे असे चालतेच. मुक्तता झाल्यानंतरची शेख साहेबांची वक्तव्ये मोठी मजेशीर आहेत. त्यांच्याजवळ निश्चित योजना नाही (असं ते म्हणतात) 'भूतानचा दर्जा' अशी वार्ता येऊन गेली ! धोरणात बदल नाही, असे इंदिराजी म्हणतात. "नव्या शक्यतांचा विचार" मात्र त्या करणार आहेत. त्या शक्यता कोणत्या ? "स्वतंत्र–स्वायत्त काश्मीर–भूतान दर्जाचे काश्मीर ?" मग इतकी वर्षे रक्त, घाम, पैसा कशासाठी खर्चला? किंमत कुणी वेचली ? कां? कशासाठी? राजकारण्यांच्या ह्या विचित्र लहरीपायी आपण केलेल्या कष्ट-त्यागाचे काय ? दोन युद्धे कशासाठी झेलली ? वलिदानाची हीच किंमत ? हिंदु-मुस्लिम ऐक्याच्या, भारत-पाक सलोख्याच्या गोष्टी शेखसाहेब वोलतात. नेहरू–गांधी हे त्यांचे परवलीचे शब्द वनले आहेत. पण हे सारे नवीन नाही. नेहरू कृपेने शेखसाहेब आजवर काश्मीरबावत एकमेव 'प्रेषित' म्हणूनच वागले आहेत. भारत-पाक मैत्री काही केवळ काश्मीरवर अवलंबून आहे असे मानणे म्हणजे पाक निर्मितीच्या मागली सर्व पार्श्वभूमी विसरून जाण्यासारखे आहे. पाकिस्तानची निर्मिती हे ऐतिहासिक सत्य आहे. त्यासाठी आम्ही दिलेली जबर किंमत हेही एक सत्य आहे. आजही 'निर्वासित' हा शब्द व त्यामागच्या रांगा कायम आहेत. काश्मीरसाठी घडलेली दोन युद्धे हेही सत्य आहे. ही सारी सत्ये विसरता न येण्याइतकी भयाण सत्ये आहेत. जागतिक दडपणे आली तरीही ही सत्ये कशी विसरणार ? शेखसाहेबांची मुक्ति जरी कोसीजिन साहेबांच्या दडपणातून घडली असली, तरी ऐक्य भावना काही लादून निर्माण करता येत नाही हेही सत्य आहे. नेहरू–गांधींच्या प्रयोगाची जबर किंमत (मुस्लिम प्रेम 'विकत' घेण्यापायी) ह्या देशाने दिली आहे. आता काश्मीरबावत सावध राहण्याची गरज आहे. शब्दांची अवडंबरे माजविली जात आहेत. शेखसाहेबांना स्वतंत्र काश्मीरची (तीच) स्वप्ने पुन्हा पडत आहेत. "नव्या शक्यता कोणत्या?" हे इंदिराजी मोकळेपणाने सांगत नाहीत. शेख साहेव जुन्याच वाती वळत आहेत. यातून एक नवा घोळ (आपला आवडता राष्ट्रीय खेळ) उत्पन्न झाला आहे. ह्याचे उत्तर कोणते ? ईदच्या (निधर्मी) दिवशी मुक्त झालेले प्रेषित अब्दुल्लाच त्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकतील. पण त्यांचे नागरिकत्व अजून ठरायचे आहे म्हणतात. त्यांनीच आपली १९४७।४९ मधली वक्तव्ये पुन्हा वाचावीत. उत्तर सापडेल. प्रश्न मिटेल.

--सारस्वत







अनुक्रमणिका

ЗD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment FEBRUARY 1968



Cover Printed At Asha Printery, Bombay 4

अनुक्रमणिका